अगदीं अतिशय संताप आला. पण आमचे काव्यजंगल कसले शांत पुरुष ! त्यांनीं हें वाक्य ऐकून आपले डोळे उघडले. आणि त्याला म्हणाले—

" मित्रा, मी तुला येथें दिसत असलों, तरी माझें अंतःकरण येथें नाहीं. तें निराशेनें जळून त्याचा निवळ कोळसा बनला आहे ! "

" श्रीयुत, " स्वागताध्यक्ष कविमहाशयांजवळ येऊन अदबीनें म्हणाले. " वेळ थोडा उरला आहे. आणि अजून पुष्कळ साहित्यभक्तांना आपला परिचय करून द्यावयाचा आहे...... "

" कांहीं हरकत नाहीं ! मी आतां आटोपतोंच. मित्रहो, अशा रीतीनें माझ्या आशा, प्रेम, चटसारें जळून गेलें आहे. आणि आतां निराशेच्या त्या धगधगीत स्थंडिलांतून माझ्या काव्याचा हा अप्रतिहत झोत एकसारखा... "

" मिस्टर, आतां त्या स्थंडिलावर एक बादलीभर पाणी ओतून विझवा ही आग ! "

" हें पहा, पुन्हा असें कांहीं तरी मध्येंच बोलाल, तर तुम्हांला बाहेर काढावें लागेल. " श्री. गगनविहारी यांनीं त्या मध्येंच बोलणाऱ्याला तंबी दिली ! पण त्यामुळें प्रकरण हमरीतुमरीवर येऊन जी गडबड उडाली, तींत श्री. काव्यजंगल यांचे अखेरचे शब्द माझ्या कानावर आले नाहींत. पण थोडक्याच वेळांत भाषण संपवून ते खालीं बसले, तेव्हां टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला ! आणि त्यावेळीं मी सुद्धां अगदीं हाताला झिणझिण्या येतपर्यंत टाळ्या पिटल्या !

कविराज खालीं बसल्यावर मी त्यांच्याजवळ जाऊन त्यांचें अभिनंदन केलें. त्यांनीं डोळे बिळे पुसून आणि घसा वगैरे साफ करून मला विचारलें— " कां गोप्या ? कसें काय वठलें ? "

" वाः ! तुम्ही तर सर्वांवर मात केलीत बुवा ! "

" पण लेका, ओरडून आणि रडून माझा जीव बघ अगदीं सुकून ला आहे ! कांहीं आहे का खिशांत ? निदान दोन सिंगल... "

" हो हो ! तेवढे निघतीलसे वाटतात ! चला. "

नंतर आम्ही दोघे जवळच असलेल्या बंडूमामाच्या गोल्डन टीच्या दुकानांत गेलों. आणि तेथल्या गोल्डन फळकटावर मांडी ठोकून आम्ही एकेक सिंगल चहा प्राशन केला. चहाचें बिल चांगलें सणसणीत चार पैसे झालें ! आणि तें मलाच द्यावें लागलें. आमच्या कविमित्रानेंही खिशांत हात घातल्यासारखें केलें, पण त्यांत ( म्हणजे खिशांत ) कांहीं अर्थ नव्हता ! आणि ही गोष्ट मला पुरती माहीत असल्यामुळें त्यांच्या त्या आविर्भावानें मी मुळींच फसलों नाहीं.

नंतर मग आम्ही सभेकडे वळलों नाहीं. रात्रीं परत कवींचें कवितागायन व्हावयाचें होतें. आणि त्यांत काव्यजंगलांनींही—लोकांच्या विरोधास न जुमानतां—भाग घेण्याचें नक्की केलें होतें ! तेव्हां आपल्या कांहीं पेटंट कवितांची रंगीत तालीम करण्यासाठीं आम्ही दोघेही मग एका वडाच्या झाडाखालीं तळ देण्यासाठीं निघालों.

रात्रीच्या कवितागायनाला सर्व वाचकांनीं यावें, अशी माझी आग्रहाची विनंति आहे ! स्वयंसेवक या नात्यानें दारावर मीच असल्यामुळें तिकिटाची काळजी नको ! काय म्हणतां ? वर आणखी बक्षीस लावलें तरी देखील येण्याची इच्छा नाहीं ? नका येऊं बापडे ! !



# पोटासाठीं !

बंडोपंत ऑफिसांतून बिऱ्हाडीं आले आणि बाहेर व्हरांड्यांतच एक मोडकी खुर्ची भिंतीसरशी मांडून तीवर हुश्श करीत बसले. सकाळीं नऊ वाजल्यापासून ऑफिसांत डांबून घेतल्यामुळें त्यांचा जीव अगदीं सुखून गेला होता. आणि दोन घोट गरम चहा केव्हां एकदां तोंडांत पडतो, असें त्यांना होऊन गेलें होतें. पण आंतून चहाची वर्दी कांहीं येईना ! चाळीच्या व्हरांड्यांतील घनघोर कलकलाटामुळें आपणांला कदाचित हांक ऐकूं आली नसेल, म्हणून त्यांनीं खिडकींतून आंत डोकावून देखील पाहिलें. पण कांहीं नाहीं ! अगदीं सामसूम ! स्टोव्हचा आवाज सुद्धां कानावर येईना. तेव्हां आज हें विपरीत आहे तरी काय, तें पहाण्यासाठीं ते आंत शिरले. तेव्हां आपलें कुटुंब घरांत नाहीं, ही गोष्ट त्यांचे ध्यानांत आली. आंतल्या खोलींत डोकावून पहातात, तों आंतही कोणी नसून फक्त म्हातारी ( त्यांची चुलती ) अर्धवट अंधारांत सुंठ कुटीत बसली आहे असें आढळून आलें !

" काकू, नारू ग कोठें गेला ? " बंडोपंतांनीं विचारलें. त्यांचा मुलगा नारू हाही घरांत नव्हताच. पण त्यांना वास्तविक आपल्या कुटुंबाची चौकशी करायची होती. परंतु जुन्या काळच्या म्हातारीजवळ तशी चौकशी कशी करावी, म्हणून त्यांनीं नारूचें निमित्त केलें, इतकेंच !

" काय म्हणतोस ? नारू होय ? " खलबत्त्याचा खणखणाट क्षणभर थांबवून आणि त्या अंधुक प्रकाशांत आपली अंधुक नजर बंडोपंतांकडे वळवून म्हातारी म्हणाली. "अरे, नारूला घेऊन तुझी बायको त्या पोटभरे डॉक्टरकडे गेली आहे."

" तें कां ? "

" अरे कां काय ? त्या पोराला आज दोन दिवसांत मुळींच परसाकडेला झालें नाहीं ! कीं अन्नावर त्याची तिळभर वान्शा नाहीं ! तुला मुळीं डॉक्टरकडे जायला फावतच नाहीं. मग ती काय करील ? "

" बरें ठकीचें आतां कसें आहे ? "

" ठकीला मी नुकतीच आपल्या मुरुडकर वैद्याला दाखवून आणली. आज त्यानें औषध बदलून दिलें आहे. "

" जळोत तीं औषधें ! " बंडोपंत त्रासून म्हणाले. " आमची सर्वांची पोटाची तक्रार आहेच. पण ह्या नखाएवढ्या पोरांनासुद्धां रोज कॉन्स्टिपेशन होऊं लागलें, तेव्हां आतां करायचें तरी काय ? "

बंडोपंतांच्या कुटुंबांत एकंदर माणसें पांच. ते स्वतः, त्यांचें कुटुंब, त्यांची म्हातारी चुलती, आणि त्यांचीं दोन मुलें नारू आणि ठकी. पण हीं पांचही माणसें पोटाच्या तक्रारींनीं अगदीं जिकिरीस आलीं होतीं ! पैकीं त्यांची बायको आणि मुलगा यांना डॉक्टर पोटभरे यांचें औषध चालू होतें. पण म्हातारीच्या आग्रहास्तव ठकीला मात्र वैद्यव्याघ्र मुरूडकर वैद्य यांची ट्रीटमेंट चालू केलेली होती. म्हातारी स्वतःच कांहींतरी गांवठी औषधें आलटून पालटून घेत असे आणि स्वतः बंडोपंत तर प्रथम आयुर्वेद, नंतर इंग्रजी आलोपाथी, पुढें होमिओपाथी, आणि या सर्व पाथ्या नामोहरम होऊन चारी मुंड्या चीत झाल्यावर आतां पुढें काय करावें या विवंचनेंत गढून गेलेले होते !

" हीं बघ मुरूडकरांनीं आज चार औषधें दिलीं आहेत ! ते म्हणाले, यांतलें प्रत्येक औषध इतकें जलाल आहे, कीं दोन दिवसांत पार फडशा करून टाकील ! "

" कुणाचा ? ठकीचा, कीं माझा ! "

" बंद्र ! काय बोलतोस हें ! " म्हातारी संतापून म्हणाली. " आणि तूं कुणाबद्दल बोलतो आहेस हें ! मुरूडकर म्हणजे तूं कोण समजतोस ? ते काय असे तसे वैद्य आहेत ? "

" छे ! म्हणतो कोण ? ते वैद्यव्याघ्र आहेत ! आणि म्हणूनच मी असें म्हणतों आहें ! " म्हातारीनें पुढें टाकलेलीं औषधें पहात बंडोपंत म्हणाले.

त्यांतल्या एका बाटलीवर ‘ अगस्तक्यावलेह ’ असें लिहिलेलें असून त्याचा उच्चार करतांना बंडोपंतांचा प्राण अर्धा झाला ! दुसऱ्या एका औषधाच्या पुडीवर ‘ सुलभशौचसिद्धिवटिका ’ असें लिहिलेलें होतें. आणि दुसऱ्या एका पुडीवर ‘ गगनभेदी चूर्ण ’ असें नांव होतें ! “ बापरे ! ” बंडोपंत हंसून म्हणाले. “ आकाशाचेंही चूर्ण करणारें औषध या बाघाजवळ आहे ! पण बाकी कांहीं असलें, तरी माझ्या पैशाचें मात्र हें खास चूर्ण करून टाकील ! ”

“ कायरे बडबडतो आहेस ? ” म्हातारी म्हणाली.

“ कांहीं नाहीं ! म्हटलें, हीं औषधें घ्यायचीं तरी केव्हां केव्हां ? ”

“ हां ! तें माझ्याही एखादेवेळीं लक्षांत राहायचें नाहीं. तेव्हां तुला पण सांगून ठेवतें. एक पहांटे चार वाजतां ! तुझ्या घड्याळाचा गजर बरोबर लावून ठेव बरें का ! बरें, दुसरें प्रहर दिवसास, आल्याच्या रसांत खलून घ्यायचें ! तिसरें जेवण्यापूर्वी. आणि चौथें निजण्याचे वेळीं म्हाळ्याच्या रसांतून ! ”

“ बापरे ! पण काकू, हीं प्रत्येकाचीं अगदीं चार चारच औषधें म्हटलीं, तरी पांच जणांचीं मिळून वीस औषधें होतात ! तेव्हां यांच्या वेळा, अनुपानें आणि घेण्याचीं प्रमाणें हीं लक्षांत कोण ठेवणार ? ”

“ पुरे झालें तुझें ! तुला आपला सगळ्याच गोष्टींचा बाऊ. आणि प्रत्येकाचीं रे चार चार कुठें आहेत ? माझीं तर काय, जेवतांना हिंगाष्टक चूर्ण, जेवल्यावर पंचामृतपर्पटी, सकाळीं त्रिफळा आणि निजतांना...काय बर तें ! अगदीं तोंडावर आहे ! पण हो ! अरे बंडू, या बडबडींत तुझा चहा तसाच राहला ! देतोस का तो स्टो पेटवून मला ? म्हणजे देत्यें थोडा करून. ”

“ नको. ती आलीच वाटतें. ” बंडोपंत बाहेर दृष्टि टाकीत म्हणाले. आणि इतक्यांत रखमाबाई नारूला घेऊन आंत आल्याही.

“ काय ? पोटभऱ्यांचें पोट भरलें का ? ”

"नाहीं!" रखमाबाई बंडोपंतांपुढें बिल टाकीत म्हणाल्या.

"काय ? साडेतेरा रुपये ?" बंडोपंत आश्चर्यानें म्हणाले.

"मग ? माझें आणि नारूचें मिळून आहे तें ! आणि त्यांनीं सांगितलें आहे,..."

"काय बुवा ? शिवाय आणखी काय आहे ?"

"त्यांनीं सांगितलें आहे, तूर्त नारूला निवळ दूध आणि फळें यांवर ठेवा."

"भले बहाद्दर ! योजना तर फारच चांगली आहे. कारण, मुंबईत या दोन्हीही गोष्टी अगदीं सुकाळाच्या !"

"आणि ऐकलें का ?" रखमाबाई चहासाठीं स्टोव्ह पेटवीत म्हणाल्या. "डाक्टरनीं हें औषध माझ्यासाठीं लिहून दिलें आहे."

"काय आहे पाहूं ? एनोज् फ्रुट सॉल्ट ! वा ! मोठाच शोध लावला हा डॉक्टरनें. हें तर पिऊन पचवूनही बसलों आहों आम्ही ! पण पुरे हें आतां पोटाचें रडगाणें. आतां अगदीं वीट आला ! आतां हीं सारीं औषधें गुंडाळून त्या फंडताळांत गाडून टाक. आणि घटकाभर तरी या पोटाच्या विवंचनेंतून मला सोडव !" बंडोपंत त्रासून म्हणाले आणि तीं औषधें आणि त्यांचीं बिलें दृष्टिआड होण्याकरितां ते आपला चहाचा कप घेऊन बाहेरच्या खोलींत येऊन बसले. चहा पिऊन झाल्यावर थोडी सुपारी तोंडांत टाकून एक खाकी सिगारेट त्यांनीं शिलगावला आणि करमणुकीसाठीं म्हणून एका मासिकाचा जुना अंक चाळण्यास त्यांनीं सुरवात केली. तों पहिल्याच पानावर '**शौचास साफ**' या जाड अक्षरांच्या मथळ्याची जाहिरात त्यांच्या दृष्टीस पडून त्यांच्या पोटांत नुकताच गेलेला चहा ढवळूं लागला ! तेव्हां संतापानें तें पुस्तक भिरकावून देऊन ते वळकटीला टेंकून क्षणभर स्वस्थ डोळे मिटून पडले. पण ते क्षणभरच ! कारण थोड्याच वेळांत म्हातारीनें त्यांना हांक मारली—

"अरे बंडू, ऐकलेंस का ?"

"काय ?"

" मला वाटतें, नारूला जंत झाले असावेत ! " म्हातारी नारूचें पोट चोळीत म्हणाली.

" असतील ! "

" असतील ! असतील काय ? या डाक्टरांना कांहीं समजत नाहीं म्हणतें, तें का उगीच ? तें कांहीं नाहीं. तूं असाच जाऊन वावडिंगें घेऊन ये पाहूं ? पोराला खात्रीनें कृमि झाले आहेत ! "

म्हातारीनें तांतडीनें सांगितलें खरें. पण बंडोपंत कांहीं वावडिंगें आणायला उठले नाहींत. उलट वळकटीचे आश्रयानें अधिकच लंबायमान होऊन ते म्हणतात—" खरोखर हें वीतभर पोट, पण बेट्यानें आम्हांला पक्कें हातटेंकीस आणलें आहे ! "

" होय बाबा ! या वीतभर पोटासाठींच ना साऱ्या धडपडी कराव्या लागतात ? "

" अग तसें नव्हे ! " बंडोपंत उसळून म्हणाले. " पोटासाठीं म्हणजे पोट भरण्यासाठीं नव्हे. तर पोट रिकामें करण्यासाठीं ! मी गेल्या महिन्याचा मुद्दाम हिशेब ठेवला आहे. आणि त्यावरून माझी अशी खात्री झाली आहे, कीं अन्नखर्चापेक्षां पोटें साफ ठेवण्याकरितां दुप्पट खर्च आपल्याला लागतो ! "

" भले बंडोपंत ! " डॉ. दडपे खोलींत प्रवेश करीत म्हणाले. " तुम्ही हा खूपच मोठा शोध लावलात ! " दडपे हे वास्तविक डॉक्टर नव्हते. पण स्वतःला लोकांनीं डॉक्टर म्हणावें ही मात्र त्यांची जबर इच्छा ! आपण नेचरक्युअर सिस्टिमचे ( नैसर्गिक उपचारांनीं रोग बरे करण्याची पद्धति ) डॉक्टर आहों, असें ते आपल्याला म्हणवीत. त्यामुळें अलीकडे त्यांचा व बंडोपंतांचा विशेष परिचय झाला होता.

" हें पहा डॉक्टरसाहेब, मी हें कांहीं तरी सांगत नाहीं. हा कागद् पहा. म्हणजे जेवणापेक्षां या पोटाच्या औषधांचा खर्च किती मोठा आहे, हें तुम्हांला चक्क समजून येईल. "

" आहे बुवा ! पण बंडोपंत, हा सगळा निसर्गाचे नियम मोडण्याचा परिणाम. अहो व्यायाम, मोकळ्या हवेंत फिरणें......"

" पुर, पुरे हें व्याख्यान ! " बंडोपंत त्रासून म्हणाले. " या सवंग सुकाळाच्या उपदेशानें माझें अलीकडे डोकें फिरून जाऊं लागलें आहे ! म्हणे निसर्गाचे नियम. कसले हो बोडक्याचे निसर्गाचे नियम ? अहो जेथें मोकळी हवाही नाहीं, आणि फिरायला वेळही नाहीं, तेथें कसले मोकळ्या हवेंत फिरतां ? आणि व्यायाम काय, आपोआप घडतोच आहे ! हल्लीं ट्रामला खर्चायला खिशांत दिडकीच नसल्यामुळें म्हारबावडीपासून वाडी-बंदरापर्यंत रोज दौड करावीच लागते आहे ! तें कांहीं नाहीं. याचें खरें कारण म्हणजे मूळ पोटाची रचनाच पार चुकीची बनवली गेली आहे ! ही चूक आमची नाहीं. "

" मग कुणाची बुवा ? "

" ही चूक ब्रह्मदेवाची आहे ! "

" भले बहाद्दर ! " डॉ. दडपे विडीच्या धुराचा भपकारा सोडीत ह्मणाले. " तुम्ही आतां ब्रह्मदेवाच्यासुद्धां चुका काढूं लागलांत, तेव्हां शर्थच झाली म्हणायची ! "

" थट्टा नव्हे ! पण तुम्हीच पहा, आपण नेहमीं या पोटाला वीतभर पोट म्हणतों कीं नाहीं ? "

" हो म्हणतों. "

" मग त्यांतच आपण ब्रम्हदेवावर अप्रत्यक्ष टीका करीत असतों. मी असें म्हणतों, कीं हातपाय चांगले इतके लांबलांब बनवले, आणि हें पोटच तेवढें अगदीं वीतभर कां ? चांगलें हातभर केलें असतें, तर त्याच्या काकाचें कांहीं खर्चत होतें का ? "

" वाहवा ! मात केलीत बुवा ! " दडपे जोरानें खोखावत म्हणाले.

" मात मी केली नाहीं. पण तुमच्या ब्रह्मदेवानेंच ही वेढेपणाची मात करून सोडली आहे ! आधीं तें एवढेंसें पोट आणि त्यांत तीं कशीं तरी चोंदून भरलेलीं आंतड्यांचीं जुंबाडीं ! त्या आंतड्यांची लांबीच म्हणे वीस फूट

आहे ! म्हणजे एखादे टीचभर पिशवींत खूपशीं दोरखंडें कोंबून भरावीं, तसेंच हें आहे ! त्याला पोट जर एवढें वीतभरच ठेवायचें होतें, तर मग आंतडीं हो इतकीं कशाला ? पण सगळाच आचरटपणा ! पण लोक मात्र गंभीरपणानें म्हणतात, कीं विधात्यानें अतिशय चातुर्यानें हा सुंदर आणि व्यवस्थित मनुष्यदेह निर्माण केला आहे. पण मला कांहीं यांत विधात्याच्या अकलेची तारीफ करण्यासारखें दिसत नाहीं. खरें पुसाल, तर मनुष्याची शरीररचना म्हणजे वेडेपणाचा एक मासला आहे ! "

" अहो, परमेश्वराची लीला आहे ही. "

" तें खरें हो, पण ' पोरांचा खेळ होतो पण बेडकांचा जीव जातो ' या गोष्टीप्रमाणें आमची गत झाली आहे ! पोटाची हेंगाडी रचना करून ठेवल्यामुळें तुम्हां डॉक्टरलोकांचीं पोटें चांगलीं भरतात. तेव्हां तुम्हीं ब्रह्मदेवाची पाठ थोपटावी हें ठीकच ! पण या परमेश्वराचे लीलेमुळें आमच्या पोटावर पाय आले आहेत ! काय बघा, म्हणे प्रत्येक घांस निदान बत्तीस वेळां चावून खावा; नाहीं तर तो पचत नाहीं ! अरे, पण याचा अर्थ काय ? असलें नाजूक पोट जें बनवलें आहे, तेंच जरा भारी सामान वापरून चांगलें दणकट केलें असतें तर ? आणि मी म्हणतों, दांत तरी कशाला आणि अन्न चावा तरी कशाला ? आम्ही माणसांनीं जशीं कडबा कापण्याचीं, शेंगा फोडण्याचीं यंत्रें बनवलीं आहेत, तसें एक भक्कम यंत्र जर पोटांत लावून ठेवलें असतें, तर अन्न नुसतें गिळलें, कीं काम भागलें असतें ! पण एवढें डोकें आहे कुठें ? त्यांचें ठीक आहे. पण याचा परिणाम आम्हाला भोगावा लागतो आहे. म्हणे अन्न अगोदर मरेमरेतों चावा; शिवाय तें पचण्यासाठीं व्यायाम करा, जोर काढा, उठाबशा काढा, टांगून घ्या, धांवा आणि हाडान्हाड पिळवटून घ्या ! थोडेंच खा. असेंच करा आणि तसेंच करा ! कोण पंचायती ! "

" कांहीं पंचाईत नाहीं. कोठा साफ ठेवला, म्हणजे सर्व कांहीं सुरळीत चालतें. "

" हं: ! म्हणे कोठा साफ ठेवा. पण कोठा साफ करणें म्हणजे काय कमी यातायातीची गोष्ट आहे ? रेचक घ्या, वांतीचीं औषधें घ्या, नाहीं तर एनिमा घ्या. मनासारखा कांहीं कोठा साफ होत नाहीं ! "

" छे छे ! बंडोपंत, तुम्ही शर्थ केलीत बुवा ! मला वाटतें, मनुष्यप्राणी निर्माण करतांना यापुढें ब्रह्मदेवानें तुमचा सल्ला घेतला पाहिजे ! मग असें करा, आपल्या त्या ऋषींच्या प्लँचेटवर त्याला पाचारण करा..."

" छे ! असल्या खुळांवर माझा विश्वास नाहीं. ब्रह्मदेवाची आणि माझी समक्षच गांठ पडली, तर हें शक्य आहे. पण त्याची गांठ घ्यायला मला स्वर्गांत गेलें पाहिजे ! "

" छे बुवा ! स्वर्गांत जाण्याची इतकी घांदल करूं नका ! आणि शिवाय..." पण इतक्यांत डॉक्टरसाहेबांना कोणी भेटायला आलें आहे असें कळल्यामुळें ते तांतडीनें उठून गेले. आणि बंडोपंत तो मासिकपुस्तकाचा जुना अंक पुन्हा पोटावर घेऊन वाचूं लागले. 'मला जेवायचें नाहीं' म्हणून त्यांनीं म्हातारीला सांगून टाकलें. त्यामुळें त्यांना वाचायला आणि विचार करायला जरा निवांत वेळ सांपडला.

हळूहळू अंधार पडूं लागला. तेव्हां बंडोपंतांनीं हातांतलें पुस्तक खालीं ठेवून ते जरा पडले. थोड्याच वेळांत खिडकींतून चांदणेंही खोलींत डोकावूं लागलें आणि त्या चांदण्याच्या किरणाच्या आधारानें कोणीतरी खिडकांत प्रवेश करीत आहे, असेंही बंडोपंतांच्या दृष्टीस पडलें !

ती व्यक्ति हळूहळू स्पष्ट दिसूं लागली आणि थोड्याच वेळांत बंडोपंतांचे अगदीं जवळ येऊन उभी राहिली ! तेव्हां बंडोपंतांनीं हळूच तिच्याकडे भीत भीत पाहिलें; तों त्या व्यक्तीला चार तोंडें असलेलीं त्यांचे दृष्टीस पडलीं ! !

" भिऊं नकोस ! " ती व्यक्ति हंसत बोलूं लागली. " तुझें मघांचें भाषण ऐकून मला कौतुक वाटलें. आणि म्हणून मी तुझ्या भेटीस आलों आहें. मी कोण हें तूं ओळखलें असशीलच ! "

" होय महाराज ! आपण......आपण...... "

" होय होय ! तोच मी ! मलाच ब्रह्मदेव म्हणतात. आतां सांग पाहूं तुझे तुमच्या शरीररचनेबद्दल काय आक्षेप आहेत ते ? "

" कांहीं नाहींत ! "

" कांहीं नाहींत कसे ? हें बघ, तूं अगदीं भिऊं नको. खुशाल मन-मोकळेपणानें सांग. कारण तूं कांहीं सुधारणा सुचविल्यास मी त्यांचा अवश्य विचार करीन ! "

आतां मात्र बंडोपंतांची भीति बरीचशी कमी झाली आणि ते म्हणाले— " महाराज, आपणच पहा, आम्ही माणसें पूर्वी बैलगाडीनें प्रवास करीत असूं. नंतर आम्ही वाफेची गाडी केली. नंतर विजेची केली. आणि आतां तर विमानांच्या खटपटींत आहों ! "

" बरें मग ? "

" पण आपण एकदां जी मनुष्याची रचना हजारों वर्षांपूर्वी ठरवून टाकली, त्यांत नंतर कांहींच सुधारणा झाली नाहीं ! आमच्या सांप्रतच्या परिस्थितीला आणि मुंबईच्या ह्या हवापाण्याला आपलें हें पोट अगदींच निरुपयोगी आहे ! "

" असें ! "

" महाराज, आतां वेळच आली आहे, तेव्हां स्पष्ट बोलतों याची माफी असावी. पण आपल्या या पोटाची रचना इतकी गिचमिडीची झाली आहे, कीं तें साफ ठेवायला आमची तीन चतुर्थांश शक्ति आणि संपत्ति खर्ची पडत आहे ! "

" मग काय करावें असें तुझें म्हणणें आहे ? "

" मी असें म्हणतों, " आपल्या पोटांत आतां सुधारणा होण्याची आशा आहे असें पाहून बंडोपंत आनंदून म्हणाले, " पोटाची रचना एखाद्या कपाटासारखी किंवा टेबलाच्या खणासारखी असावी ! त्याला पुढच्याच बाजूला एक दार असावें आणि त्याला एक चांगलें मजबूत कुलूप लावतां येईल, अशीही व्यवस्था असावी... "

" शाबास ! " ब्रह्मदेव हंसून म्हणाले. " तुझें डोकें बरेंच चलाख दिसतें ! " ब्रह्मदेवानें असें उत्तेजन दिल्यावर बंडोपंत अधिकच फुशारून म्हणाले—

" अशी व्यवस्था असली, म्हणजे पोट साफ ठेवणें हें काम अगदीं बिनखर्चाचें आणि बिनश्रमाचें होईल. "

" हं ! आणखी काय ? "

" आणखी अन्न पचण्याची भानगड माणसाच्या मागें नसावी ! त्यानें अन्न चावावें, ही शर्त मुळींच असूं नये ! आतां शोभेकरितां म्हणून दांत असले तरी चालतील. पण ते फक्त दाखविण्याकरितां ! खाण्याकरितां आणखी दांतांचीं अडगळ तोंडांत बाळगण्याची पीडा माणसाच्या मागें असूं नये ! आतां यामुळें दंतवैद्यांच्या पोटावर पाय येतील हें खरें, पण त्याला इलाज नाहीं ! तेव्हां करावें काय, तर पोटांतच एक अन्न पचविणारें छोटेंसें मशीन बसवावें. आणि पोटाचें दार उघडून त्यांत अन्न ठेवलें, कीं तासाभरानें तें पार जिरून जाईल, अशी आपोआप व्यवस्था व्हावी ! "

" वेडा रे वेडा ! " ब्रह्मदेव चारी तोंडांनीं एकदम हंसत म्हणाले. " कायरे, तुला जर असलें पोट दिलें तर चालेल का ? "

" हो हो ! " बंडोपंत खाटेवरून टुणकन खालीं उडी मारून म्हणाले. " हें काय विचारतां ? माझी अगदीं एका पायावर तयारी आहे. महाराज, माझी दशा आपल्याला काय सांगूं ? तें समोरचें फडताळ पहा; पोटाच्या औषधांनीं नुसतें ठेंचून भरलें आहे ! हीं सारीं औषधें केवळ पोटासाठीं खरेदी केलेलीं आहेत. तरी पोटाची तक्रार कायम आहेच ! "

" बघ हो ! असलें पोट तुला दिलें तर मग मी तुझी कांहीं तक्रार ऐकणार नाहीं ! " ब्रह्मदेवानें अशी धोक्याची सूचना दिल्यावर बंडोपंत जरा चरकले. आणि डोकें खाजवीत स्वस्थ उभे राहिले ! तेव्हां चतुरानन पुढें म्हणाले—हें पहा, तसें नको. अगोदर अशा पोटाचा दुसरा एक मनुष्य नमुन्यासाठीं तूं बघ..."

" हां हां ! ही खाशी युक्ती आहे ! असा एखादा मनुष्य आहे ? "

" हो हो ! आणि नसला, तर तयार करायला किती वेळ लागतो. चल !"

लगेच ते दोघे त्या खिडकींतूनच निसटले ! आणि थोड्याच वेळांत ब्रह्मदेवानें असा मनुष्यप्राणी बंडोपंतांस दाखविला. त्यावेळीं तो निजला असल्यामुळें ब्रह्मदेव आणि बंडोपंत हळूच त्याच्या खोलीचे दाराशीं गेले. आणि त्यांनीं हलकेच आंत प्रवेश केला. तों बंडोपंतांना काय चमत्कार दिसला ? तो माणूस उताणा निजला आहे, आणि त्याच्या पोटाचें दार उघडून एक मांजर आंतील लाडू आपल्या पंजानें बाहेर काढीत आहे ! !

" बापरे ! " बंडोपंत एकदम ओरडले. " हें नव्हतें माझ्या लक्षांत आलें ! ही तर मोठीच पीडा होणार ! पण याच्या पोटाला कुलूप नाहींका ? "

" आहे तर ! " ब्रम्हदेव म्हणाले. " पण जेवल्याबरोबर त्यानें तें लावण्याचा जरा आळस केला. आणि इतक्यांतच त्याला सुस्ती येऊन त्याचा जरा डोळा लागला, तों या टपलेल्या मांजरानें आपलें काम उरकलें ! पण एवढ्यानेंच काय झालें ? एखादेवेळीं दुष्काळ पडला तर माणसें किल्ल्या चालवून किंवा वेळीं कुलूपही तोडून वाटेल त्याचें पोट उघडतील. आणि कोणालाही घांसभर अन्न पचूं देणार नाहींत ! "

" खरें आहे ! हें माझ्या लक्षांतच आलें नव्हतें ! " बंडोपंतांच्या डोक्यांत आतां लख्ख प्रकाश पडून ते वरमून म्हणाले.

" बरें, माणसाच्या शरीररचनेविषयीं तुझ्या आणखी काय सूचना आहेत ? "

" कांहीं नाहींत ! " बंडोपंतांनीं साफ सांगून टाकलें ! " मला असेंही वाटे, कीं ज्याप्रमाणें घड्याळाच्या यंत्रांचे सुटे भाग मिळतात, आणि तेवढा भाग नवा बसविला म्हणजे घड्याळ चांगलें दुरुस्त होऊन चालूं लागतें, तसेंच माणसाचेंही असावें. पण आतां मला तसें वाटत नाहीं. कारण मग माणसांच्या शरीराच्या अवयवांच्याही चोऱ्या होऊं लागतील ! आजपर्यंत शरीरसंपत्ति ही तरी एखादा गरीब मनुष्य निर्वेधपणें भोगूं शकतो. पण

मग जुलमी सत्ताधारी, आणि बळी तो कानपिळी या वृत्तीचे लोक हे गरीबांना आणि दुर्बलांना हेंही सुख लाभूं देणार नाहींत. आणि माकडांच्या शरीरांतील विशिष्ट ग्रंथि काढून घेण्याकरितां माणसें जशीं त्यांच्या जिवावर उठलेलीं आहेत, तोच प्रकार माणसांमाणसांत चालू होईल! म्हणून म्हणतों, महाराज, आहे तेंच ठीक आहे असें मला आतां वाटूं लागलें आहे!"

"लवकरच उमजलास म्हणायचा ! अरे, आम्हीं सारे प्रयोग करून शेवटीं ही शरीररचना मुक्रर केलेली आहे. तुम्हां मनुष्यांचें ज्ञान मुंगीचे पावलानें वाढत असल्यामुळें आपण दिवसेंदिवस सुधारत आहों, असें तुम्हांला म्हणतां येतें. पण ती गोष्ट आम्हांला लागू करून चालायचें नाहीं ! समजलास ?..."

पण पुढें ब्रह्मदेव काय म्हणाला, तें बंडोपंतांना ऐकूंच आलें नाहीं. कारण, "अरे बंड्या, असा अवेळीं काय निजलास ? ऊठ ! हीं चार द्राक्षें आणलीं आहेत, तीं तोंडांत टाक, नी मग नीज हवा तर ?" असें त्यांची चुलती ओरडून म्हणाली. आणि त्याबरोबर पंतांनीं डोळे उघडले. तों काय ? ब्रह्मदेवाचा पत्ताच नव्हता !

ब्रह्मदेव गेला खरा. पण त्यानें दिलेलें ज्ञान बंडोपंत विसरले नाहींत. आजपर्यंत ते सगळा दोष पोटालाच देत. पण आतां सगळा दोष पोटाकडे नसून त्याचा मोठा वांटा पोट वापरणाराकडेच आहे, असें त्यांचें मत बनत चाललें आहे !



# लोकमान्य-प्राशन !

[ सदरहू लोकमान्यप्राशनाची हकीकत मला माझे मित्र श्री. सावळ्याभाऊ यांनीं सांगितली. आणि ती त्यांच्याच शब्दांत येथें खालीं देत आहे. ]

आमच्या चाळीचें खरें नांव काय तें खरोखर अजून मला माहीत नाहीं. मी या चाळींत रहायला आल्यापासून तिला बदक चाळ याच नांवानें ओळखतों. आमची ही चाळ जरी एका बाजूला असली तरी तिची प्रसिद्धी या माहीमच्या पट्ट्यांत कांहीं कमी नाहीं. कारण या एका चाळींत अनेक संस्था आणि अनेक चळवळी यांची बारा मास एकच दंगल माजलेली असते. आमच्या चाळीचे पुढारी ह्मणजे दे. भ. नागोपंत उर्फ नागू अण्णा. आणि नागोपंतांची खोली, ह्मणजे सगळ्या चळवळींचें हपीस.

आमच्या चाळींत अनेक चळवळी चालत, यावरून खादीची अव्यवहार्य चळवळहि तेथें चालत असेल, असा मात्र कोणी आपला गैर समज करून घेऊं नये. आमच्यांत सुताळ आधीं क्वचितच होता आणि एखाद दुसरा असला, तरी आमच्या प्रचंड बहुमतापुढें त्याला नुसतें तोंड उघडणें सुद्धां शक्य नव्हतें.

बाकी एवढें खरें, कीं अलीकडे आमच्या साऱ्या चळवळींना एकप्रकारचें मांद्य आलें होतें. आणि राजकारणाची एकादी नव्या दमाची पण व्यवहार्य अशी चळवळ जर निघाली तर ती आम्हांला पाहिजे होती आणि एक दिवस आमची बैठक रात्रीं नागोपंतांच्या खोलींत बसली असतां अशी एक नवी चळवळ आमच्या नागोपंतांना अकस्मात् सांपडलीहि !

'अरे टाळी द्या टाळी !' नागोपंत भाला वाचतां वाचतां एकदम ओरडले आणि मी टाळीसाठीं चटकन हात पुढें न केल्यामुळें त्यांची ती टाळी माझ्या मांडीवर आदळून मी त्या वेदनेनें ओरडलोंसुद्धां !

नागोपंतांची ती चापट आणि माझें तें ओरडणें यामुळें सर्व मंडळींचें लक्ष आमच्याकडे आपोआपच वेधलें गेलें. जनूभाऊ बिझिकचीं पानें वांटीत

होते, त्यांचासुद्धां हात जागच्याजागीं थबकला आणि बंडोपंतांचें उघडलेलें तोंड, आणि त्यांत टाकण्यासाठीं हातांत घेतलेली तंबाकूची चिमूट, हीं सुद्धां जशाच्यातशींच राहिलीं.

‘ पण नागण्णा, अहो असें झालें तरी काय ? ’ खंडू सुतार मध्येंच म्हणाला.

‘ अरे लेको व्हायचेंय काय ? जें व्हायचें तेंच झालें ! ’ दे. भ. नागोपंत विजयीमुद्रेनें आमच्याकडे पहात ठांसून म्हणाले. पण या त्यांच्या सांगण्यानें कोणाच्याच डोक्यांत प्रकाश पडला नाहीं ! शेवटी मी त्यांना पृच्छा करणार तों तेच पुढें म्हणतात—

‘ अरे, आमच्या पुण्याच्या पुढाऱ्यांची ती डोकीं ! तीं काय पोकळ आहेत ? आमच्या पुण्यांतला एखादा फाटका पुढारी साऱ्या जगाला राजकारणाचे धडे शिकवील. आमचा हा एक भालाच......’

‘ पण नागोपंत, ’ मी मध्येंच धीर करून विचारलें. ‘ आज भाल्यांत असें नवलविशेष तरी काय आहे ? ’

‘ आपल्याला जें पाहिजे, तेंच आहे ! ’ नागोपंत म्हणाले. पण अजून त्यांत काय आहे, त्याचा कांही त्यांनी आम्हांला पत्ता लागूं दिला नाहीं ! त्यांनीं ज्यासाठी आनंदानें टाळी देण्याकरितां हात उभारला, तें त्यांच्या आनंदाचें कारण अजून आम्हांला समजलें नव्हतें ! पण शेवटीं नागोपंतांना आमची दया आली आणि ते पुढें म्हणाले—‘ अरे तुम्हांला एखादी खुसखुशीत राजकीय चळवळ पाहिजे होती ना ? ’

‘ हो हो ! जरूर पाहिजे आहे ! ’ आम्ही सर्वजण कावळ्यासारखे एकदम ओरडलों.

‘ पण कसली नवी चळवळ निघाली आहे ? कसला सत्याग्रह—’

‘ हंः ! ’ खंडू सुताराला पुरतें बोलूं न देतां मध्येंच नागोपंतांनीं तिरस्कारानें नाक उडवून म्हटलें. त्या कायदेभंगाच्या आणि सत्याग्रहाच्या

चळवळी काढायला आमचे पुढारी काय खुळे आहेत ? अरे राजकारणांत मुरलेलीं माणसें ना तीं ? '

' बरोबर आहे ! ' बंडोपंत गंभीर मुद्रा करून ह्मणाले. ' त्यांचा धंदाच तो ! चालतां बोलतां, जेवतां खातां—'

' बस बस ! तेथेंच थांबा ! ' बंडोपंतांच्या तोंडावर हात ठेवून नागोपंत ओरडले. ' जेवतां खातां करण्याची राजकीय चळवळच भालाकारांनीं काढलेली आहे ! लोकमान्य-भोजन आणि लोकमान्य-प्राशन ! वाहवा ! वाहवा !' नागोपंत आनंदानें डोलूं लागले.

' काय, लोकमान्य-भोजन ? '

' आणि लोकमान्य-प्राशन ? '

' हो हो ! लोकमान्य-भोजन आणि लोकमान्य-प्राशन ! तुह्मांला माहीतच आहे, कीं लो. मा. टिळक हे स्वर्गवासी झाले. ' नागोपंत गंभीर चेहरा करून ह्मणाले.

' होय. ' तितक्याच गंभीरतेनें आम्ही त्यांच्या सर्व अनुयायांनीं त्यांना एकदम उत्तर दिलें.

' आणि आतां त्यांची पुण्यतिथि एकदोन दिवसांवर आलेली आहे; तेव्हां त्यांच्या पुण्यतिथीच्या निमित्तानें महाराष्ट्राच्या राजकारणाला नवा जोर आणण्यासाठीं दे. भ. भोपटकर यांनीं ही लोकमान्य-भोजनाची नवी टूम काढली आहे ! याचें नांव डोकें ! '

' पण लोकमान्य-भोजन ह्मणजे काय करायचें असतें ? '

' हात वेड्या ! अरे दोनतीन चांगलीं रसरशीत पक्वान्नें करायचीं, रुचकरशा चटण्या, कोशिंबिरी, घोंसाळ्याचीं खुसखुशीत भजीं....'

' आणि गरिबांना पोटभर...... '

' छे छे ! तेथें गरीब आणि श्रीमंत हा भेदच नाहीं. राजकारणांत असले भेद काय कामाचे ? ' नागोपंत मध्येंच म्हणाले.

‘ कबूल. पण खर्चाची तजवीज ? ’ काशीनाथपंत म्हणाले.

‘ अरे खर्चाची कसली पंचाईत ? जेवणारांकडून चांगली ठणठणावून वर्गणी घ्यायची आहे ना ? मग तो गरीब असो वा श्रीमंत असो. राजकारणांत असली भीडभाड नाहीं ! ’

‘ वा ! मजा आहे ! ’ जनूभाऊ कौतुकानें म्हणाले. ‘ आणि लोकमान्य–प्राशन तें काय ? ’

‘ तें तर भोजनापेक्षांही सोपें आणि कमी खर्चाचें ! फक्कडसा चहा, चिवडा, बिस्किटें, यांचा छोटासा बेत आणि एखाद्या पुढाऱ्याचें चुणचुणीत व्याख्यान ! म्हणजे झालें लोकमान्य–प्राशन ! ’

‘ हात् त्याच्या ! ’ खंडू सुतार मध्येंच ह्मणाला. ‘ ही कसली नवी टूम आणि यांत कसलें आहे डोकें ? ’

‘ बेटा खंडू, तूं अजून बच्चा आहेस ! शिवाय तुझें शिक्षण पडलें अल्प. तूं कांहीं पदवीधर नाहींस. तेव्हां या गोष्टीतलें मर्म तुझ्या लक्षांत येणें शक्य नाहीं. पण जरा सबूर कर. आपण लोकमान्यप्राशनाचा समारंभ करणार आहों, त्यांत मी जें व्याख्यान देणार आहें, त्यांत या गोष्टीचा अवश्य खुलासा करीन. पण तूं हें लक्षांत ठेव, की हा राजकीय चळवळीचाच एक महत्वाचा भाग आहे. अरे, आपल्या या प्राशनाचा रिपोर्ट जेव्हां भाल्यांत फडकेल, तेव्हां त्यांत तुझेंही नांव छापून निघेल ! लेका, आज सात वर्षे तूं हीं खादीचीं गोणपाटें पेहरतो आहेस; पण तुझें कधीं नांव छापून प्रसिद्ध झालें आहे का ? ’

‘ नाहीं बुवा ! मग हें प्राशन जरूर करा ! ’

‘ आणि या समारंभांत आपले ते परळचे सुप्रसिद्ध कवि ‘ काव्यजंगल ’ यांचें कवितागायन करवूं. ’ जनूभाऊ ह्मणाले.

पण काव्यजंगल हें नांव ऐकतांच माझ्या अंगावर एकदम कांटा उभा राहिला. गेल्या वर्षी एका गणेशोत्सवांत त्यांच्या कवितागायनाच्या तडाक्यांत मी सांपडलों होतों. त्यांच्या त्या कवितांत जितकें काव्य होतें, तित-

केंच त्यांच्या गायनांत माधुर्य होतें ! ते असे हेल काढीत आणि मधून मधून असे बकऱ्यासारखे ओरडत, कीं अजून आठवण झाली तरी माझ्या पोटांत कळमळूं लागतें ! त्यामुळें तोच प्रोग्राम उद्यांच्या प्राशनांत होणार हें ऐकतांच माझ्या तोंडचें पाणी पळालें. श्री. काव्य-जंगल हे जनूभाऊंचे मित्र असल्यामुळें हें संकट टळणार नाहीं, या विषयीं माझी खात्रीच होती. परन्तु आसन्नमरण झालेला रोगी जसे शेवटचे हातपाय हालवतो त्याप्रमाणें मी शेवटीं झटलें:—

'छे: ! त्यांत कवितागायन कशाला ? शिवाय तो एवढा बडा कवि, त्याला उगाच तसदी कशाला ?'

"छे छे ! सांवळ्याभाऊ, अहो तुम्हाला त्याची कल्पना नाहीं ! तो एवढा प्रसिद्ध कवी आहेना ! पण त्याला अभिमान झणून कसा तो माहीत नाहीं. त्याला निरोप,—नव्हे, नुसती बातमी लागण्याची खोटी, कीं तो आलाच झणून तुम्ही बेलाशक समजा ! शिवाय झणाहो, झणाहो, म्हणून त्याला आग्रहही करायला नको ! एकदां सुरुवात केली म्हणजे नुसता पाऊस पडतो पाऊस ! एकामागून एक, एकामागून एक ! तुम्ही पुरे म्हटलेंत तरी तो मग ऐकायचा नाहीं ! अहो झांकलें रत्न आहेना तें !"

'मग त्यांना जरूर बोलावा !' नागोपंत म्हणाले. झालें. सर्व बेत ठरला आणि लगेच नागोपंतांनीं या समारंभाचें खालीलप्रमाणें हस्तपत्रकही छापायला टाकलें:—

दे. भ. नागोपंत यांचे अध्यक्षतेखालीं

**लोकमान्य-प्राशन !**

**ठिकाणा बदक चाळ ( माहीम )**

कार्यक्रम

**दे. भ. नागोपंत यांचें चिमुकलें व्याख्यान.**

आणि

**कविवर्य श्री. काव्यजंगल यांचें हृदयाच्या चिंधड्या**

उडविणारें कवितागायन.

उपाहार

१ अस्सल लिप्टनचा स्ट्राँग चहा.

२ तुपांतला धारवाडी प्रोज चिवडा.

३ चहाचें दुसरें वाढप.

वर्गणी

अवघी १ रुपया !

आजच नांवें नोंदवा.

( २ )

करत। करतां लोकमान्य-प्राशनाचा तो महत्वाचा दिवस उजाडला ! वर्गणी जमविण्याचें काम बहुतेक पार पडलेंच होतें. येऊन जाऊन एक खंडू सुतार काय तो वर्गणी देण्याचे कामीं चुळबुळ करीत होता; पण त्यालाही नागोपंतांनीं वर्गणी द्यायला लावलें. लोकमान्य-प्राशनाचें तत्व खंडूला मान्य होतें. पण तपशिलाचे बाबतींत त्याचा मतभेद होता ! त्यांतल्या चहा-चिवडा या बाबी त्याला पूर्णपणें मान्य होत्या. व्याख्यान व कवितागायन याही बाबतींत त्याचा विरोध नव्हता. पण एक रुपया वर्गणी ही एकच बाब त्याला नापसंत होती ! एक दोन कप चहा आणि मूठभर चिवडा याला एक रुपया पडणार नाहीं, असें व्यवहारांत मुरलेल्या खंडूचें प्रामाणिक मत होतें. पण एक रुपया वर्गणी ही कार्याच्या महत्वाचे मानानें कांहींच नव्हे, असें दे. भ. नागोपंत यांचें प्रामाणिक मत होतें ! पण या दोन प्रामाणिक मतांच्या लढाईत शेवटीं नागोपंतांनींच युक्तीप्रयुक्तीनें जय मिळविला !

त्या दिवशीं संध्याकाळचीं जेवणें लवकरच आटोपून आम्ही सारे देश-भक्त दे. भ. नागोपंत यांचे खोलींत जमा झालों. नागोपंतांनीं आज खोली विशेष तऱ्हेनें शृंगारली असून समोरच उच्चासनावर लोकमान्यांची तसबीर

पुष्पहारयुक्त मांडली होती. त्या तसबिरीकडे आम्ही सर्वजण जणूं एकाग्र चित्तानें पहात आहों, असें तिऱ्हाइताला त्यावेळीं वाटलें असतें. पण आमचें सगळें लक्ष पडद्याच्या आंत सळसळणाऱ्या चहाच्या आधणाकडे गुंतलें होतें ! आजचा चहा कांहीं विशेष प्रकारचा होणार आहे असें नागोपंतांनीं आह्मांला बजावलें होतें. त्यामुळें चहाच्या आधणाच्या मधुर ध्वनीकडे आमचें कर्णेंद्रिय अगदीं वेधून गेलें होतें आणि पलीकडे सस्तूताई चिवड्याला फर्मास फोडणी देत होत्या, तिकडे आमचें घ्राणेंद्रिय गुंतलें होतें. यावरून आह्मी खादाड लोक आहों, असा मात्र कोणी भलताच समज करून घेऊं नये ! लोकमान्यांचे स्मरणाचीं आणि आमच्या राजकीय चळवळीचीं प्रतीकें या नात्यामुळेंच आमचें लक्ष त्या प्रसादवस्तूंकडे इतकें लागलें होतें. चाणाक्ष लोक हें जाणतीलच आणि जे कुत्सित आहेत त्यांच्याकरितां आम्हीं हें सांगतच नाहीं !

असो. लोकमान्यांच्या तसबिरीसमोर उदबत्त्या वगैरे लाविल्यावर, कार्यक्रमास सुरवात होणार, असें नागोपंतांनीं जाहीर केलें. कार्यक्रमांतील पहिली बाब " नागोपंतांचें चिमुकलें व्याख्यान " ही होती. पण प्रथम ती बाब सुरू न करितां प्रथम चहाचें पहिलें वाढप सुरू करावें, अशी सूचना श्री• काशिनाथपंत यांनीं आणिली आणि तिला श्री. बापूराव यांनीं दुजोरा दिला. कार्यक्रम असा ठरला असतां मागून या लोकांनीं असा गोंधळ कां घातला ह्मणून कोणी विचारील; पण काशिनाथपंतांचें हें करणें तितकेंसें वावगें नव्हतें. किंबहुना व्यवहारास व वस्तुस्थितीस जास्तच धरून होतें असें म्हटलें तरी चालेल ! कारण, नागोपंतांच्या व्याख्यानाच्या मागें जरी चिमुकला हा शब्द होता, तरी त्यांत कांहीं अर्थ नव्हता; आणि अर्थ असलाच तर तो अगदीं उलट प्रकारचा होता ! थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे चिमुकला हा शब्द केवळ नागोपंतांचा विनय दर्शवीत होता, इतकेंच ! कारण, आम्हीं सभासदांनीं दे. भ. नागोपंतांचीं चिमुकलीं व्याख्यानें ऊर्फ " चार शब्द " अनेकवार ऐकिलें होते. आणि त्या चार शब्दांनीं निदान तीनतीन तास तरी

आमचे खाल्लेले होते ! वस्तुस्थिति अशी असल्यामुळें नागोपंतांच्या चिमुकल्या व्याख्यानाच्या हातांत आपले कान देऊन कोणता व्यवहारी देशभक्त आपला सोन्यासारखा चहा थंड करून घेईल ?

खुद्द नागोपंतांना कांहीं काशीनाथपंतांची ही सूचना आवडली नाहीं. पण बहुमत आपल्या विरुद्ध आहे हें उघड उघड दिसत असल्यामुळें त्यांनींही फारसें ओढून धरलें नाहीं आणि प्रथम चहाचें पहिलें वाढप होऊन मग नागोपंतांचें चिमुकलें व्याख्यान व्हावें, असें एकमतानें ठरलें ! मग काय विचारतां ? ताबडतोब चहानें तुडुंब भरलेले प्रचंड कप आमच्यापुढें दाखल झाले आणि आम्ही चहा पिण्याच्या कार्यक्रमांत अगदीं गढून गेलों.

चहा खरोखरच फक्कड बनलेला होता आणि आम्ही त्याबद्दल श्री. गोपाळराव यांना धन्यवादही दिले. पण तो विनयशील पुरुष ते मुकाट्यानें कसचे ऐकून घेतो ? त्यानें या गोष्टीचें श्रेय लोकमान्यांच्या पुण्याईला आणि भालाकारांच्या कल्पनाशक्तीला निमेनिम वांटून दिलें ! आमचा खंडू सुतार तर चहा-प्राशनानें अगदीं फुशारून जाऊन आनंदानें म्हणाला—

"कायहो नागोपंत, हें लोकमान्यांचें प्राक्तन दर रविवारीं केलें, तर काय बहार उडेल ! "

"खंड्या !" नागोपंत रागानें ओरडून म्हणाले 'लेका तुला सरळ बोलतांही येत नाहीं. अरे हें लोकमान्यांचें प्राक्तन नव्हे. हें प्राशन आहे प्राशन !'

"हां हां ! तेंच. पण हें प्राक्शन दर रविवारीं केलें तर और मजा येईल !"

खंडू सुताराचें हें अगाध ज्ञान पाहून आम्ही खरोखरच प्राक्तनाला हात लावला ! याला आतां काय उत्तर यावें आणि याच्या शहाणपणाला हंसावें की रडावें, तेंच आम्हाला समजेना. पण यांत त्याचा काय बरें दोष होता ? या नव्या राजकीय चळवळींतलें मर्म त्या बेट्या अडाण्याला एकाएकीं कसें उमगावें ?

खंडू सुताराच्या या प्रश्नाला नागोपंत उत्तर देणार तोंच खालीं कसलासा गलबला झाला. त्यामुळें आमचें सगळ्यांचें लक्ष्य तिकडे वेधलें गेलें आणि तो गलबला म्हणजे दुसरेंतिसरें कांहीं नसून श्री. काव्यजंगल हे आपल्या काव्यांच्या चोपडया एका हमालाच्या डोक्यावर देऊन आमचे खोलीवर चाल करून येत आहेत, हें आमच्या एका क्षणांत निदर्शनास आलें !

श्री. काव्यजंगल यांनीं खोलींत प्रवेश केला आणि हमालाचे डोकी-वरील काव्यांचा गठ्ठा खालीं उतरविण्याकरितां त्यांनीं त्याला हातभार लावला. कवितांच्या चोपड्यांचें ओझें एवढें जबर होतें, कीं ती पाटी खालीं उतरतांना थोडी कलती झाली आणि त्यांतल्या भारी वजनाच्या एक दोन चोपड्या हमालाच्या पायावर पडून त्याचा आंगठा पार चेचून निघाला !

' मूर्खा ? पाहिलेंस हें ? ' त्यांपैकीं एका चोपडीचा कोंपरा, ती खालीं पडल्यामुळें किंचित मोडला, त्याकडे बोट दाखवून कविराज हमा-लावर ओरडले !

' पण तात्या, माझा हा आंगठा चेंगरून मोडला की ! '

' मूर्खा, या चोपड्यांपुढें तुझ्या आंगठ्याची बिशाद ती किती ? पण हें रे काय ? ' चोपड्यांच्या ढिगाकडे निरखून पहात काव्यजंगल ओरडले. ' अरे, कांहीं चोपडया तूं वाटेंत पाडल्यास कीं काय ? '

' खरें कीं काय ? ' जनूभाऊंनीं घाबरून विचारलें !

शिष्टाचार म्हणून मीही तोंडावर दुःखाची छटा आणण्याचा प्रयत्न केला. पण खरोखर मला या गोष्टीविषयीं तिळभर देखील दुःख झालें नव्हतें ! फार काय, पण जर खरोखरीच त्यांतलीं दोन तीन बाडें हरवलीं असतील, तर तेवढा मराठी वाङ्मयांतला कचरा कमी झाला असें समजून मला आनंदच झाला असता ! पण मराठी भाषा तेवढी दैववान नव्हती ! कारण त्या चोपड्या मोजून कविराज आनंदानें म्हणाले...

' नाहीं ! आहेत. तेवीसच्या तेवीस आहेत ! मला उगाच संशय आला.

बाकी पडल्या असत्या, म्हणून त्यांतलें काव्य अजीबात नष्ट झालें असतें, असें नाहीं कांहीं. '

' म्हणजे ! '

' अहो, यांतल्या प्रत्येक चोपडीची दुसरी प्रत घरीं आहे ना ? आणि शिवाय या सगळ्या चोपड्यांची नोंद पुण्यास सांपडेलच ! '

' ती कशी काय ? '

' अहो, गेल्या मे महिन्यांत पुण्यास जें साहित्य संमेलन भरलें होतें, त्यावेळीं काढलेली परिचयपत्रिका मी भरून दिली आहे ना ! त्यांत ' अप्रसिद्ध पण सिद्ध वाङ्मय ' या सदराखालीं या तेवीस चोपड्यांची नोंद आहे आणि ' संकल्पित वाङ्मय ' या सदराखालीं आणखी सतरा नांवें मी लिहून दिलीं आहेत ! मला वाटतें, माझीं हीं सगळीं काव्यें खंडशः छापून काढण्याचा त्यांचा बेत असावा ! माझें गणगोत्रसुद्धां त्यांनीं आदरेखून लिहून घेतलें आहे ! '

श्री. काव्यजंगल यांच्या काव्यांची संख्या, त्या काव्यांची साहित्यसंमेलनानें घेतलेली खास नोंद आणि तीं सर्व काव्यें खंडशः प्रसिद्ध होण्याची बातमी, हें सर्व ऐकून आमची सगळी मंडळी अगदीं चीत होऊन गेली ! आणि एवढा प्रचंड कवि आजच्या समारंभाला लाभला याबद्दल त्यांना धन्यताही वाटली ! भोळे बिचारे ! श्री. काव्यजंगल यांच्या काव्याच्या जंगलांत शिरल्यावर आपली केवढी दाणादाण उडेल, याची त्यांना कल्पनाही नव्हती !

चहाचें पहिलें वाढप आटोपल्यावर नागोपंतांचें व्याख्यान व्हावयाचें ठरलें होतें. पण कविमहाराज आपल्या कवितांच्या संभारासह लवकर उपस्थित झाल्यामुळें आतां प्रथम त्यांचेंच कवितागायन व्हावें असें जनूभाऊंनीं नागोपंतांच्या कानांत हळूच सांगितलें आणि बिचाऱ्या नागोपंतांनाही त्यांच्या या सूचनेला मान तुकावणें भाग पडलें !

'हां ! मग काय म्हणतां ? प्रथम कोणती कविता म्हणूं ?'

'एखादी राष्ट्रीय...'

'एखादी ? अहो एखादी कां ? माझ्या सगळ्याच कविता राष्ट्रीय आहेत !' काव्यजंगल अभिमानानें म्हणाले. 'आणि म्हणूनच स्वामी कर्दमानंद यांनीं मला राष्ट्रशाहीर ही पदवी बहाल केली आहे. परन्तु प्रथम शारदास्तवन करून नंतर त्या विषयाकडे वळूं.' कविराज म्हणाले, आणि उभे राहून व हात जोडून त्यांनीं शारदास्तवनास सुरवात केली.

ऊठ शारदे, ऊठ शारदे, ऐकें हे बोल ।
नव्या युगाचा नवा शिपाई, बघ याचा डौल ! ॥

मग काय विचारतां ? खवळलेल्या समुद्रांतून प्रवास करणारी बोट जशी प्रचंड हेलकावे खाते, त्याप्रमाणें त्यांच्या अत्युच्च आणि अतिनीच स्वरांनीं आमचीं हृदयें वर खालीं होऊं लागलीं ! आम्ही शारदेचें जें चित्र समोरच लावलें होतें, तें वाऱ्यानें मधून मधून फडफडत होतें. पण तिकडे पाहून, या कवीच्या स्तवनाच्या तडाक्यानें विव्हळ होऊन शारदा मोरासकट जीव घेऊन पळण्याच्या बेतांत आहे, असेंच मला वाटलें !

अशा रीतीनें आरंभीं शारदेला चारीमुंड्या चीत केल्यावर श्री. काव्यजंगल यांनीं आपलें पेटंट राष्ट्रीय पद गावयाचें ठरविलें. त्याबरोबर सगळे लोक पुढें सरसावून बसले. पण मी मात्र जवळ होतों तो उलट लांब, एका कोंपऱ्यांत जाऊन बसलों. याचें कारण मी अनुभवी होतों आणि अमळशानें या कवीच्या जवळ बसणाऱ्या लोकांची दाणादाण उडेल, हें मी जाणून होतों !

श्री काव्यजंगल यांचें हें पेटंट पद 'राजहंस माझा निजला' या पेटंट चालीवरच होतें. कविराजांनीं प्रथम आपला घसा साफ केला. अस्तन्या मागें सारल्या, वीरासन ठोकलें, आणि एकदम गर्जना केली:—

हा कोण इथे बसलेला ? ।
लोकमान्य केसरिवाला ॥

दोनच ओळी ! पण त्या दोन ओळींनीं केवढा हाहाःकार केला ! ' हा कोण इथे बसलेला ' ही ओळ डोळे लाल करून आणि एवढ्या दरडावणीनें त्यांनीं म्हटली, कीं त्यामुळें लहान मुलें भेदरून किंकाळया मारूं लागलीं. बायका घाबरून गेल्या आणि ' हा कोण इथे बसलेला ?' हा प्रश्न करितांना त्यांनीं अभिनयासाठीं आपला हात इतक्या झटक्यानें लांब केला, कीं त्याचा तडाका जवळ बसलेल्या जनूभाऊंच्या गुळगुळीत डोक्यावर बसून ते तत्काळ बेशुद्ध होऊन खाली पडले आणि त्यांच्या धक्यानें बापूरावही कोलमडले ! एवढा प्रकार झाल्यावर कवीला खेंटून बसलेले लोक लांब लांब जाऊन बसले ! आणि आमचा खंडू सुतार तर तेथून अक्षरशः पळाला !

पण या प्रकाराकडे बिलकुल लक्ष न देतां ' लोकमान्य केसरीवाला ' हा दुसरा चरण श्री. काव्यजंगल यांनीं तितक्याच आवेशानें धडकावला ! आणि पुढेंही ती कविता संपेपर्यंत त्यांनी श्रोत्यांच्या दाणादाणीकडे लक्ष न देतां आपलें गायन सुरूच ठेविलें.

पण ही कविता संपतांच नंतर मंडळीनें त्यांना दुसरी कविता ह्मणावयास बिलकूल आग्रह केला नाहीं ! आणि तेच होऊन नवीन कवितेला सुरुवात करतील, म्हणून ' काय करावें, आतां टाइमच राहिला नाहीं ' असें पुटपुटत नागोपंतांनीं चिवडा वाढायला आणण्याची सूचना ताडकन देऊनही टाकली ! जनूभाऊंच्या ताळूवर थोडें गार पाणी शिंपडल्यावर तेही हळूहळू शुद्धीवर आले.

' छे ! अगदींच तुह्मी भावनाप्रधान बुवा ! जनूभाऊ, माझ्या कवितेचा इतका का परिणाम तुमच्या मनावर झाला ? " काव्यजंगल स्मित करून म्हणाले !

वास्तविक जनूभाऊंचे मनावर परिणाम झालेला नसून, परिणाम त्यांच्या

गुळगुळीत डोक्यावर झाला होता ! परंतु आपल्या कविमित्राची अब्रू सांभाळण्याच्या उद्देशानें जनूभाऊ काव्यजंगलांस म्हणाले—" छे बुवा ! तुमच्या कवितेंत प्रतिभाच फार ! अहो, तुम्ही दोन ओळी म्हटल्याबरोबर माझ्या काळजानें एकदम ठाव सोडला ! "

अशा रीतीनें पुन्हा सगळें स्थिरस्थावर झाल्यावर दे. भ. नागोपंत हे व्याख्यान देण्याकारितां उभे राहिले. आम्ही एका आपत्तींतून सुटलों आणि दुसऱ्या आपत्तींत जाऊन पडलों ! पण काय करणार ? नागोपंत बोलतील तितकें आणि बोलतील तें, निमूटपणें ऐकणें आम्हांला भाग होतें !

नागोपंत उभे राहिले आणि टाळ्यांच्या गजरांत बोलूं लागले—" मित्रहो, आज केवढा सोन्याचा दिवस उगवला आहे हा ! आज एका नव्या जोमदार चळवळीचा आपण आरंभ केला आहे ! आज ही चळवळ बाल्यावस्थेंत आहे. पण लवकरच महाराष्ट्रांत ही चळवळ चारी दिशा फोंफावेल असा माझा दृढ विश्वास आहे ! गांधींची असहकारितेची चळवळ अव्यवहार्य असल्यामुळें ती यशस्वी होणें शक्य नाहीं. पण मित्रहो, ही भोजनाची आणि प्राशनाची नवी टूम, महाराष्ट्राची नाडी बरोबर ओळखणाऱ्या धुरंधर मुत्सद्यानें काढलेली असल्यामुळें ती अयशस्वी होण्याचें भय मला मुळींच वाटत नाहीं. ( टाळया ) देशभक्तहो, लोकमान्यांच्या पुण्यतिथीला ही चहाचिवड्याची जोड दिल्यामुळें या पुण्यतिथीला पुष्कळ लोक जमतील. आणि ' स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे ' हें लोकमान्यांचें ब्रीद्वाक्य ते पाठ करून टाकतील ! पहा ! स्वर्गस्थ लोकमान्यसुद्धां स्वर्गातून आपलें कौतुक करीत आहेत, असें मला वाटतें..."

पण यापुढील नागोपंतांचें भाषण मला ऐकूंच आलें नाहीं. कारण हळूहळू मी झोंपेच्या स्वाधीन होऊं लागलों होतों. आणि झोंपेच्या गुंगींत मला स्वर्गस्थ लोकमान्य कपाळाला हात लावून आमच्याकडे पहात आकाशांत उभे आहेत, असें दिसूं लागलें होतें ! आमच्या या प्राशनाच्या चेष्टा पाहून त्यांना दुःख होत असावें, असें त्यांच्या चर्येवरून सहज दिसून येत होतें.

आणि 'इतर कोणत्याही लोकांपेक्षां माझे अनुयायी म्हणविणाऱ्या या लोकांच्या चेष्टांनींच माझ्या तत्वांचा व चळवळींचा नाश केला आहे.' असे त्यांनीं उद्गारही काढले. पण इतक्यांत आमच्या मंडळींपैकीं एकानें माझा हात खसकन ओढून मला उठवलें आणि म्हटलें—

" सावळ्याभाऊ, अरे ऊठ ! हें रे काय ? अरे तूं अगदीं कसा अरसिक ! नागोपंतांचें सारें भाषण तूं झोंपेंतच ऐकलेंस कीं काय ? चहाचें दुसरें वाढप होऊन लोकांनीं चहासुद्धां पिऊन टाकला. तरी तुझा चहा आपला तसाच निवत पडला आहे. छे छे ! तुम्ही खादीवाले अगदींच गबाळ बुवा ! ऊठ. घे लोकमान्यांचें नांव आणि टाक पिऊन तो चहा ! "

त्याचें भाषण ऐकून मी चांगला खडखडीत जागा झालों. तों जनूभाऊ लहानसें भाषण करायला उभे राहिले आहेत, असें मला दिसून आलें. आणि फिरून माझ्या पोटांत गोळा उभा राहिला ! पण जनूभाऊंचें भाषण कांहीं फारसें लांबलें नाही. ते म्हणाले,—" लोकांना माझी इतकीच अगत्याची विनंति आहे की, पुढील गणेशोत्सवांत ज्यांना कविवर्य काव्यजंगल यांच्या कवितांचें गायन करवायचें असेल, त्यांनीं आतांच आपलें आमंत्रण नोंदवून ठेवावें ! गेल्या वर्षीं आमंत्रणांची अफाट गर्दी झाल्यामुळें कविराजांना पुष्कळ ठिकाणीं नकार द्यावा लागला. म्हणून ही सूचना आज मी त्यांच्या सांगण्यावरून मुद्दाम करीत आहें ! " एवढें बोलून जनूभाऊ खालीं बसले आणि मामूल वहिवाटीप्रमाणें लोकांनीं टाळ्या सुद्धां वाजविल्या. पण कोणीही तसें आमंत्रण कविराजांना देण्याचा हिय्या केला नाहीं. पण वाचकांनो, तुम्ही तरी ही सोन्याची संधि गमावूं नका ! लोकमान्य-प्राशनासाठीं किंवा गणेशोत्सवासाठीं श्री. काव्यजंगल यांना आतांपासून आमंत्रण देऊन ठेवा. म्हणजे मग तुम्हांला निराश होण्याचें भय राहणार नाहीं.

---

# भास्करभाऊंची शिकार !

आमचे भास्करभाऊ म्हणजे उंदिरगांवांत एक मोठें प्रस्थच होतें ! आमच्या भास्करभाऊंचा व्यवसाय कोणता म्हणून विचाराल, तर त्याचें नेमकें उत्तर देणें हें मोठ्या मुष्किलीचेंच काम आहे ! कारण वडिलांनीं [illegible]ची टोपी त्याच्या डोक्यावर ' अशा तऱ्हेच्या उद्योगांनीं भास्करभाऊंना साधारण बरीच माया राखून ठेविली होती. त्यामुळें पोटासाठीं कांहीं विशेष व्यवसाय करण्याची त्यांना जरूरी नव्हती. पण म्हणून भास्करभाऊ स्वस्थ बसून द्विबरा काढीत होते, असें मात्र नाहीं. ज्याला ' अव्यापारेषु व्यापार ' असें म्हणतात, तशा तऱ्हेचे अनेक व्यापार ऊर्फ व्यवसाय भास्करभाऊ करीत असत. पण त्यांतला मुख्य आणि डोळ्यांत भरण्यासारखा व्यवसाय म्हणजे शिकार हाच होय !

भास्करभाऊ शिकार करीत असत हें सांगितल्यावर त्यांचेजवळ बंदूक होती, आणि ती त्यांना उडवितां येत असे, हें निराळें सांगायला नकोच. ही बंदूक मात्र त्यांनीं स्वतः खरेदी केलेली नसून त्यांच्या वडिलांनीं ती मिळविली होती. आणि वडील वारल्यावर भास्करभाऊंच्या राजनिष्ठेवर खूष होऊन मेहेरबान कलेक्टरसाहेब बहादूर यांनी भास्करभाऊंकडे बंदुकीचा परवाना चालू ठेविला होता. भाऊंच्या हातून प्राणिहत्त्या होण्याचा संभव नसल्यामुळेंच कलेक्टरनें हा परवाना त्यांना दिला, अशी एक गप्प गांवांतल्या कुटाळ लोकांनीं उठविली होती. पण तीवर विश्वास ठेवण्याइतके आमचे वाचक भोळे नाहींत, याविषयीं आमची खात्री आहे !

लोक कांहीं म्हणोत. पण आमचे भास्करभाऊ हे हाडाचे खरे शिकारी होते, यांत संशय नाहीं. कारण, अगदीं लहानपणापासूनच त्यांचा कल या विषयाकडे असल्याचें दिसून आलें. आतां, त्यांच्या लहानपणीं माझा जन्मसुद्धां झाला नव्हता, ही गोष्ट खरी ! पण पुढें चरित्रकारांना पंचाईत पडूं नये, म्हणून भास्करभाऊंनींच ज्या आपल्या आठवणी एका चोपडींत लिहून

ठेविल्या आहेत, त्यांवरून मी छातीवर हात ठेवून सांगतों, कीं भास्करभाऊं-सारखा जन्मजात शिकारी महाराष्ट्रांत क्वचितच निपजला असेल !

अगदीं बाळपणीं भास्करभाऊ पाळण्यांत निजून रडत, तेसुद्धां बंदुकी-कडे पाहून रडत असत ! कोणी म्हणतात, कीं बंदुकीकडे पाहून ते भीतीनें किंकाळया फोडीत असत. पण भास्करभाऊंचें असें प्रामाणिक मत आहे, कीं ती बंदूक खांद्यावर टाकून आपणांला शिकारीस जातां येत नाहीं, म्हणून ते रडत असत ! असो. पुढें ते हळू हळू चालूं लागल्यावर त्यांनीं पहिल्यांदां ज्या वस्तूला हात लावला, ती वस्तु म्हणजे बंदूकच, आणि त्यांनीं जी पहिली वस्तु आपल्या पायांवर पाडून घेतली, ती वस्तु पण बंदूकच ! सात वर्षे अव्याहत शाळेत जाऊन जेव्हां भास्करभाऊंना साधी बेरीज सुद्धां करतां येईना, तेव्हां क्रोधाच्या आवेशांत त्यांच्या वडिलांनीं हातांतल्या बंदुकीच्या दस्त्यानेंच त्यांच्या पाठीवर प्रहार केला ! आणि त्यांच्या आईनें त्यांना जो अगदीं पहिल्यानें पलाखतीचा मार दिला, तोही बंदुकीला परवानगीशिवाय हात लावला, ह्याच गुन्ह्याबद्दल !

भास्करभाऊंनीं एक दिवस फारच हट्ट धरला, म्हणून त्यांच्या वडिलांनीं त्यांना आपल्याबरोबर शेतांत शिकार करण्यास नेलें. पण आपल्या मुलाची बंदूक धरण्याची करामत पाहून त्यांनीं त्याच्या हातांतून खसकन बंदूक ओढून घेतली. आणि "या तुझ्या बहादुरीनें तूं डुकराला मारण्याऐवजीं स्वतःचीच शिकार करून घेशील." असें म्हणून पुन्हा शिकारीच्या भानगडींत न पडण्याबद्दल सक्त ताकीद पण देऊन ठेवली ! ही हकीकत मला आजीबाईनीं ( भास्करभाऊंचे आईनें ) सांगितली. पण या प्रसंगाचें भास्करभाऊंनीं आपल्या चोपडींत पुढीलप्रमाणें वर्णन लिहून ठेविलें आहे—"बंदूक हातांत धरण्याची माझी ती ऐट, ती चलाखी आणि अचूक नेम धरण्याचें माझें कौशल्य पाहून बाबा थक्क झाले ! आणि हा पोरगा मोठा बिलंदर निपजणार, असेही त्यांनीं उद्गार काढले. पण मी हूडपणानें केवळ शिकारीचेच नादीं लागूं नये, म्हणून त्यांनीं मला

शिकारीचा नाद न धरण्याबद्दल ताकीद केली. पण ती वरवरच असून माझ्या कौशल्यामुळें बाबा बेहद्द खूष झालेले आहेत, हें मी त्यांच्या हंसऱ्या चेहऱ्यावरून तेव्हांच ताडलें ! "

पण अशा तऱ्हेचा पटाईत शिकारी आमच्या गांवाला जरी लाभला होता, तरी गांवांतला कोल्ह्यांचा उपद्रव कांहीं यत्किंचितसुद्धां कमी झाला नव्हता ! आमच्या गांवाचें नांव उंदिरगांव खरें. पण कोल्ह्यांच्या त्रासामुळें त्याला कोल्हेगांव म्हणणेंच जास्त सयुक्तिक झालें असतें ! अशा स्थितींत भास्करभाऊंना या कोल्ह्यांकडे लक्ष देण्याविषयीं गांवकरी वारंवार विनवीत. पण काय असेल तें असो. भास्करभाऊ त्यांची नेहमीं उपेक्षाच करीत असत ! पण एकदां एक शेतकरी मात्र भाऊंच्या पक्काच खनपटीस बसला ! आपल्या शेतांत रात्रीं येऊन नासधूस करणाऱ्या कोल्ह्यांचा व डुकरांचा समाचार भाऊंनीं घेतलाच पाहिजे, असें म्हणून त्यानें जवळ जवळ त्यांच्या दारांत धरणेंच घेतलें ! तेव्हां भाऊही मनांत उमजले, कीं हें प्रकरण कांहीं सामान्यापैकीं नव्हे ! शेवटीं भाऊ हंसून म्हणाले—" अरे वेड्या, कोल्ह्याची शिकार करण्यांत काय पुरुषार्थ आहे ? तुझ्या शेतांत वाघ येतो का ? "

त्यावर तो बिचारा शेतकरी म्हणाला—" एखादे वेळीं डुकर आढळतें. वाघ कांहीं अजून आढळलेला नाहीं. पण तात्या, कोल्हे काय कमी त्रास देतात ? आपण गरिबाच्या शब्दाला मान देऊन जरी एखादें कोल्हें मारलें, तरी तीन वाघ मारल्याइतका मला आनंद होईल ! "

" बरें बाबा ! चल. कोल्हा तर कोल्हा ! " एक निराशेचा सुस्कारा टाकून भाऊ म्हणाले. " पण खरें पुसशील, तर माझ्या या बंदुकीला वाघाच्या रक्ताची तहान लागलेली आहे. "

भास्करभाऊ येण्यास तयार आहेत असें पाहून त्या शेतकऱ्यास फार आनंद झाला आणि शिकारीसाठीं काय तयारी पाहिजे ती त्यांना विचारून तो लगबगीनें परत गेला.

" तात्या, सर्व तयारी केली आहे." संध्याकाळीं परत येऊन शेतकरी भाऊंना म्हणाला.

" ठीक आहे. तूं पुढें हो. मी जेवण उरकून येतों." भास्करभाऊ ह्मणाले आणि त्याप्रमाणें जेवण उरकून ते बंदूक खांद्यावर टाकून ऐटीनें शेताकडे निघाले.

" राम राम तात्या ! ही गरिबावर लई दया झाली बघा." भास्करभाऊंना आलेले पाहून शेतकरी ह्मणाला.

" अरे त्यांत कसली दया. आम्हां लोकांना तर शिकार म्हणजे एक गंमत वाटते बघ! पण हें बघ, तुम्ही कोणी इथे रात्रीं असूं नका बरें का. जास्त माणसें असलीं म्हणजे तें सारें काम बिघडून जातें!......"

" पण तात्या, तुम्ही एकटेच......"

" हे: ! एकटा असलों म्हणून रे काय झालें ? ही बंदूक आहे ना माझ्याबरोबर ? मग झालें तर. तुम्ही वाटेल तर जवळपास कुठे निजून रहा. पण मी बोलावल्याशिवाय इथें कोणी येतां कामा नये !"

" बरें साहेब. आमचें काय ? तुम्ही सांगाल तसें. शिकार आटोपल्यावर रात्रीं या झोंपडींत झोंपा. आम्हीही या शेजारच्या झोंपडींतच आहों. तुम्ही नुसती खूण करण्याचा अवकाश, कीं आलोंच."

एवढें बोलून तो शेतकरी गेला. आणि भास्करभाऊ तेथें एकटेच राहिले. चांदणें स्वच्छ पडलें होतें. आणि तशा त्या चांदण्यांत आणि मोकळ्या थंड हवेंत तेथें बसणें मोठें आल्हादकारक होतें. पण भास्करभाऊंना मात्र या गोष्टींपासून बिलकूल आनंद वाटत नव्हता ! आपल्या लटपटणाऱ्या हातांत तें बंदुकीचें धूड घेऊन ते समोरील शेतांकडे डोळे फाडून बघत होते ! कांहीं वेळ गेल्यावर शेतांत खडबड सुरू झाली आणि एकदां तर डुकराच्या तोंडासारखें कांहीं तरी पाहिल्याचा भाऊंना भास झाला. मग

काय विचारतां ? भाऊंचे हातांतून बंदूक तत्काळ खालीं पडली ! आणि आमचे भास्करभाऊ गनिमी काव्यानें लढण्याकरितांच कीं काय, जवळच्या आंब्याच्या झाडाच्या आड ते हळूच उभे राहिले ! पण तेही अगदीं थोडाच वेळ. कारण तेथेंही उभें राहणें धोक्याचें आहे हें दूरदर्शीपणानें त्यांनीं तेव्हांच ताडलें आणि जवळजवळ सरपटतच जवळच्या झोंपडींत प्रवेश करून ते अंथरुणाचा आश्रय करते झाले.

सकाळीं उजाडण्याच्या पूर्वीच तो शेतकरी भाऊंना भेटला. तेव्हां ते म्हणाले—“ या कोल्ह्यांची जात मोठी हरामखोर ! महा वस्ताद, अगदीं अर्क आहेत हे प्राणी ! ”

“ होय तात्या ! अगदीं खरें ! पण एखादें...... ”

“ अरे एखादें कां ? चांगले दोन तीन कोल्हे आणि एक डुकर गारद केलें की ! ”

“ आ ! ” शेतकरी आ वांसूनच भाऊंकडे पहात उभा राहिला.

“ तुला फारसें आश्चर्य वाटलें ? ” भाऊ हंसून म्हणाले. “ बाकी आश्चर्य तर खरेंच ! कारण जर दुसरा कोणी नवशिक्या असता, तर या इरसाल जनावरांनीं त्याचीच शिकार केली असती ! ”

“ तें तर खरेंच. ”

“ अरे खरेंच काय ? या सांगोसांगीच्या गोष्टी नव्हेत. मी प्रत्यक्ष ऐकलेल्या आहेत ! ”

“ असतील ! पण तात्या, तुम्ही एका रात्रींत एवढी शिकार मारली, तेव्हां...... ”

“ अरे त्यांत काय आहे ? दोन काय, पण मी सारींच खलास करून टाकलीं असतीं ! पण मोठी हरामजादी जात ! दोन जखमी झाल्याबरोबर बाकीच्यांनीं एकदम पळच काढला ! ”

पण भाऊंचें बोलणें पुरतें ऐकण्यापूर्वीच ते शेतकरी मेलेल्या कोल्ह्यांचा व डुकरांचा शोध लावण्याकरितां गेले. पण बिचाऱ्यांना त्यांचा मागमूसही

लागला नाहीं. त्यांनीं तें सारें रान पालथें घातलें. पण मेलेल्या श्वापदांचा पत्ता नाहीं ! शेवटीं निराश होऊन ते परत फिरले आणि त्यांनीं ही हकीगत भाऊंच्या कानावर घातली आणि विचारलें—" पण तीं नक्की मेलीं या विषयीं तुमची अगदीं खात्री आहे ? "

" हो हो ! खात्री म्हणजे काय ? "

" मग त्यांचा कुठेंही पत्ता लागत नाहीं हें कसें ? "

" त्यांत काय आश्चर्य आहे ? " भाऊ किंचित हंसून म्हणाले. " तुम्हांला त्यांतली मख्खी ठाऊक नाहीं, म्हणून तुम्हांला या गोष्टीचें नवल वाटतें ! पण आम्ही या गोष्टी प्रत्यक्ष पाहिलेल्या आहेत. जवळ जवळ ठार झालेले कोल्हे पळून दिसेनासे होतात ! ! अहा कुठे ! "

त्या शेतकऱ्यांनी भाऊंजवळ अधिक वाद केला नाहीं. आणि त्यांच्या शहाणपणाची कींव करीत ते तेथून चालते झाले. भाऊंनीं रात्रीं काय काय केलें तें त्या शेतकऱ्यानें बहुतेक पाहिलें असल्यामुळें तो भास्करभाऊंना बोलावण्याच्या भरीस पुन्हा केव्हांही पडला नाहीं !

पण किती झालें तरी या सांगोसांगीच्या गोष्टी ! तेव्हां त्या ऐकून मी कांहीं भाऊंच्याबद्दल आपला गैरसमज करून घेतला नाहीं. पण माझ्या सुदैवानें भाऊंचें शिकारीचें कौशल्य प्रत्यक्ष पहाण्याचा मला जेव्हां योग आला, तेव्हां मात्र त्यांच्या कर्तबगारीविषयीं माझी बालंबाल खात्री झाली !

नोकरीनिमित्त माझें नेहमीचें राहणें मुंबईस पडलें. पण यंदां नाताळचे रजेंत दुसरे कोठें न जातां भाऊंचे गांवी जाण्याचें मी ठरविलें होतें. सृष्टि-सौन्दर्य आणि हवापाणी या दृष्टीनें भाऊंचें गांव चांगलें तर होतेंच. आणि शिवाय भाऊंचें शिकारीचें कौशल्यही एकदां नजरेखालून घालण्याची इच्छा होती. तेव्हां त्यांच्याकडे जाण्याचा बेत नक्की करून मी तसें त्यांना पत्रही पाठविलें. त्याबरोबर भास्करभाऊंचें जें उलट टपालीं उत्तर आलें, तें येणेंप्रमाणें:—

" तूं यंदां इकडे येण्याचा बेत केला आहेस, हें वाचून अतिशय समाधान झालें आहे. तसें म्हटलें, तर आपला तीन पिढ्यांचा घरोबा. तेव्हां तुला आमच्याकडे येण्याचा कसला आला आहे संकोच ? पण तुम्ही मुंबईचीं पोशाखी माणसें. तुम्हांला मुंबई सोडून आमच्यासारख्या शिकारी लोकांबरोबर जंगलांतून भटकणें कुठलें आवडायला ? पण कांहीं असो. तूं इकडे येण्याचा शेवटीं हिय्या केलास, हेंच पुष्कळ आहे ! असो. या पत्राबरोबर मला पाहिजे असलेल्या किरकोळ सामानाची यादी पाठविली आहे, त्याप्रमाणें सामान घेऊन ये. तुझ्यासाठीं चांगला फक्कडसा चहाही घेऊन ये. इकडे चहा नाहीं असें नाहीं. पण आम्ही बोलून चालून शिकारी लोक ! आम्हांला कसलाही चहा चालतो. पण तुम्हां मुंबईकरांचें तसें नाहीं. म्हणून लिप्टन का फिप्टन कसला तो चांगला छानपैकीं चहा घेऊन ये. अगदीं उंची असेल तोच आण ! मलाही एकदां तुम्हां आंबटशोकी लोकांचा उत्तम चहा कसा असतो तें पहायचें आहे !

हो, पण सगळेंच मुसळ केरांत ! तुझीं तीं भिस्कुटें कीं काय, तीं आणायला सांगायला अगदींच विसरणार होतों ! छबी जेव्हां मुंबईला तुझ्याकडे एकदां आणली होती, तेव्हां तिला त्या भिस्कुटांची चटक लागली आहे ! तुला तिनें पाहिलें कीं त्यांची तिला नक्की आठवण होणार ! आणि मग तुझा ती अगदीं जीव काढील ! हो. छबी आहे ती ! म्हणून म्हणतों, तीं आणायला बाबा विसरूं नको. चांगलीं दोनतीन डबे घेऊन ये ! म्हणजे एखादेवेळीं आपल्यालाही चावायला होतील !

ताजाकलम—ठकी नुकतीच सासरहून आली आहे. तिच्यासाठीं कामिनिया ऑइलची एक बाटली घेऊन ये. खोबरेल तेल काय वाईट असतें ? पण पोरींचा कांहींतरी आचरटपणा ! सौभाग्यवतीला सफरचंद आवडतात हें तुला माहीतच आहे. तेव्हां त्याबद्दल तुला कांहीं सुचवायचें नाहीं असेंच मी ठरविलें आहे !"

हें पत्र वाचून माझी तर छातीच दडपली ! आणि भास्करभाऊंचा माझ्या

पैशांची शिकारच करण्याचा हा बेत आहे असें मला दिसून आलें. पण आतां करणार काय? शेवटीं भास्करभाऊंनीं कळविलेल्या सर्व सामानाच्या संभारासह मी एकदांचा भाऊंचे गांवीं जाऊन पोंचलों.

मी त्यांच्या घरांत प्रवेश केला, तेव्हां आपल्या शिकारीचा शौक मला दाखविण्याकरितांच कीं काय, भास्करभाऊ बंदूक साफसूफ करीत बसलेले मला आढळून आले. "या तुम्ही मुंबईकर! हें पाहिलेंत, आमच्या मागें हा एकच धंदा लागलेला आहे. अरे शौक म्हटला म्हणजे हें असेंच आहे!" भास्करभाऊ माझ्या सामानांतली एक मोटी ट्रंक उसकटीत म्हणाले. "अग ठके, हें तुझें कामिनिया आइल!" ट्रंकेंतली बाटली बाहेर काढीत आणि लगेच त्यांतलें कुळचाभर तेल आपल्या शेंडीला चोपडीत भास्करभाऊ म्हणाले! "आणि हें रे काय? या सिगारेट वाटतें!" त्यांतली एक सिगारेट लगेच शिलगावून भाऊ म्हणाले. "अरे, आमचें हें असेंच आहे बघ! आम्ही विड्या ओढणारे खरे, पण आम्हांला वेळीं सिगारेटही चालते! अडायचें म्हणून नाहीं, हा आमचा बाणा!" भाऊंनीं मंदस्मित करून आपल्या वागणुकींतील हा सिद्धांत मला सांगितला. आणि लवकरच तो माझ्या प्रत्ययासही आणून दिला. कारण चहा होईपर्यंत भाऊंनीं त्यांतल्या चार सिगारेट ओढून फस्त केल्या!

जेवणखाण झाल्यावर मी जरा घरांत इकडे तिकडे फिरून पाहूं लागलों, तों एका खोलीचें दार बंद असून तीवर 'संग्रहालय' अशी पाटी लावून ठेविली होती. ती पाहून आश्चर्य, आणि भास्करभाऊंच्या रसिकतेबद्दल कौतुकही वाटलें. पलीकडेच काम करीत असलेल्या काकूंना मी विचारलें—
"काकू, हे कसलें हो संग्रहालय?"

"डोंबलाचें संग्रहालय!" काकू संतापानें म्हणाल्या. "जें करायला पाहिजे तें करायचें नाहीं आणि भिकारी धंदे करून सगळ्यांना उच्छाद आणायचा!"

"पण आंत आहे तरी काय? काकांच्या शिकारीचे......"

" हो हो ! त्यांची शिकार त्यांत भरलेली आहे ! मोठेच शिकारी की नाहीं ! बेडक्या, सरडोके, असले महाभयंकर प्राणी मारून त्यांत ठेवलेले आहेत ! आंत जाऊं नको हो एकटा ! नाहीं तर अंगावर एकदम उडी बिडी घालायचे एखादे ! "

" अरे थांब ! " आमचें संभाषण ऐकून भास्करभाऊ एकदम तेथें येऊन म्हणाले. " तूं तिला कांहीं यांतलें विचारूं नको. तिला शिकारींत काय कळतें ? " त्यावर काकूंनीं यजमानांवर आणखी खूप भडिमार केला. पण त्या धीरोदात्त पुरुषानें तिकडे बिलकूल लक्ष न देतां त्या खोलीचें कुलूप काढलें आणि आम्ही दोघे आंत शिरल्यावर त्यांनीं खोलीचें दार धाडकन लावून घेतलें !

" यांत कोणी जिवंत प्राणी नाहींतना ? "

" छे छे ! " भास्करभाऊ म्हणाले.

" मग खोलीचा एवढा बंदोबस्त कशाला ? "

" अरे, आंत कोणी जिवंत प्राणी नाहींत. पण बाहेर जिवंत प्राणी आहेत ना ? त्यांचें या आंतल्या मेलेल्या प्राण्यांशीं अगदीं हाडवैर आहे ! बाबा, ही खोली मी पांच मिनिटें जर मोकळी ठेवली, तर ती आंतल्या सगळ्या वस्तु फेंकून देऊन या अमूल्य संग्रहाचा सत्यनाश करून टाकील ! "

भास्करभाऊंचें हें भाषण ऐकून माझे मनांत त्या संग्रहाबद्दल खरोखरच विशेष आदर उत्पन्न झाला आणि तेथें एका फळीवर कांचेच्या बरण्यांतून स्पिरिटमध्यें घालून ठेवलेले पदार्थ पहाण्यासाठीं मी अगदीं अधीर झालों.

" आं ! हा तर बेडूक ! " मी पहिल्याच बरणींतला तो किळसवाणा प्राणी पाहून म्हटलें. त्या बरणींत एक लांब तंगड्या करून पडलेला लहा-नसा बेडूक होता !

" होय. बेडूक तर खराच. " भास्करभाऊ गंभीरपणानें म्हणाले. "आणि बेडूक हा कांहीं शिकार करण्यासारखा प्राणी नव्हे, हेंही खरें. पण महत्व जें आहे, तें या बेडकांत नसून त्याच्या इतिहासांत आहे ! "

" मग याचा इतिहास सांगा तरी ! " त्या इतिहासप्रसिद्ध प्राण्याकडे पहात मी म्हटलें.

" माझ्या लहानपणची गोष्ट " भाऊ सांगूं लागले. " मी बंदुकीचे छरे मारायला नुकताच लागलों होतों. बाबा असे माझ्या जवळच उभे होते. इतक्यांत एक बेडूक आपल्या तंगड्या लांब करून उडी मारीत असतां मी त्यास नेमका छऱ्यानें टिपून पाडला ! हंसूं नको ! उडत्या बेडकाला नेमका छरा घालणें म्हणजे कांहीं सोपी गोष्ट नाहीं. "

" मग ही तुमची शिताफी पाहून तुमचे बाबा काय म्हणाले ? "

" बाबा तर मनांतून बेहद्द खूष होऊन गेले ! "

" पण म्हणाले काय ? "

" अरे म्हणणार काय ? तसे ते तोंडावर थोडीच शाबासकी देणार मला ? ते म्हणाले, आंधळ्यासारख्या वेड्यावांकड्या उड्या मारणारा बेडूक, आणि आंधळ्यासारखा छरे घालणारा तूं ! तेव्हां अस्मानधपक्यानें हें जुळून आलें इतकेंच ! "

मला देखील भाऊंच्या वडिलांच्या या बोलण्यांत पुष्कळ तथ्य वाटलें. पण तसें बोलण्याची मुळींच सोय नव्हती ! तेव्हां मुकाट्यानें मी पुढें पहात चाललों. पुढें एक सरडा ठेविलेला होता. त्याच्या पलीकडे एक फुलपांखरूं आणि त्याच्या पलीकडे एक टोळ ! हे प्राणी पहात आणि त्यांचे रहस्यमय इतिहास ऐकत मी पुढें चाललों असतां तेथें कावळ्याचे दोन तीन पंखच टांगून ठेवलेले पाहून आश्चर्यचकित होऊन गेलों !

" भाऊ, हें काय ? नुसते पंखच ? "

" होय. ते कावळ्याचेच पंख आहेत. आणि त्यांची हकीकत तर विशेष मौजेची आहे. एकदां काय झालें, एक बदक चाललें होतें जमिनीवरून, तेव्हां त्याच्यावर नेम धरून मी छरा सोडला. पण झाली काय मजा, तें बदक निसटून गेलेंच, पण वर झाडावर बसलेल्या कावळ्यालाच ती गोळी लागून त्याचे हे पंखच खालीं पडले ! आणि कावळा बेटा गेला उडून !"

"पण भाऊ," भास्करभाऊंच्या चातुर्याची मनांतल्यामनांत तारीफ करीत मी म्हटलें, "या संग्रहालयांत कोणी मोठा हिंसक प्राणी मारून ठेविलेला दिसत नाहीं. वाघ, सिंह राहोत, पण एखादें..."

"होय होय ! तूं म्हणतोस तें खरें आहे. या महत्वाच्या संग्रहांत तेवढीच काय ती एक उणीव आहे ! ! पण बाकी ?"

"वा ! बाकी काय विचारतां ? हें संग्रहालय म्हणजे एक मजेदार अजबखानाच आहे !" मी हंसून उत्तर दिलें.

"अरे, या बाबतींत मी पुष्कळ खटपट केली. पण माझा अगदीं नाइलाज झाला. काय करावें ? माझ्या लहानपणीं आम्हीं एखादेवेळीं तरी वाघाचें डुरकणें ऐकत असूं. पण अलीकडे त्या गुलामांनीं जसा काय बहिष्कारच टाकला आहे या प्रांतावर !"

"मग तुम्ही तरी त्याला काय करणार ? हो, श्वापदेंच नाहींत, तर शिकारी काय करणार ? पण भाऊ, कांहीं करा, पण मला एकदां तरी थोडा शिकारीचा नमुना दाखवा !"

"पाहूं ! असला तुझा योग, तर जमेलही." भाऊ म्हणाले.

पण काय असेल तें असो. तो शिकारीचा योग जमण्याचें कांहीं लक्षण दिसेना ! मी भास्करभाऊंना रोज सुचवीं आणि ते रोज कांहींतरी सबब मला सांगत. पहिला दिवस बंदूक साफ करण्यांत गेला. दुसरे दिवशीं मुहूर्तच बरासा नव्हता ! तिसऱ्या दिवशीं भाऊंना सर्दी झाली ! आणि चवथ्या दिवशीं ते कांहीं काम काढून कुठल्याशा गांवीं जे गेले, ते तीन दिवस मुळीं आलेच नाहींत ! पण मग मात्र मी निश्चय केला, कीं आतां भाऊंचा पिच्छा सोडायचा नाहीं. कारण माझी रजा आतां अगदीं संपण्याच्या बेतांत आली होती. तेव्हां भाऊ गांवाहून आल्यावर दुसरेच दिवशीं पहांटे मी भाऊंना हांक मारली. त्यांची येण्याची मर्जी दिसलीच नाहीं. परंतु आज त्यांना सांगायला कांहींच सबब न उरल्यामुळें कुरकुरत कां होईना. पण ते माझ्याबरोबर बंदुकीसह बाहेर तर पडले !

“ शेवटीं आज एकदांचा हा योग आला ! ” मी म्हटलें.

“ कसला योग म्हणतोस ? ”

“ शिकारीचा. ”

“ छे ! ” निराशेनें मान उडवून भास्करभाऊ म्हणाले. “ बंदूक घेऊन निघालें म्हणजे शिकार मिळतेच, असें थोडेंच आहे ? कोणी श्वापद आढळलें तर पाहिजे ? ”

“ येथें आढळलें नाहीं, तर आणखी पुढें जंगलांत जाऊं. ”

“ वेडाच आहेस ! ” भाऊ हंसून म्हणाले. “ अरे, हें सारें जंगल पालथें घातल्यावांचून मी अजून राहिलों आहें असें का तुला वाटतें ? मग आज उगाच हिंडण्यांत काय अर्थ आहे ? ”

“ पण जरा हिंडून तर पाहूं. न जाणों, एखादें कोल्हें किंवा...”

“ छे ! कोल्हें आणि डुकर यांची शिकार करण्यांत पुरुषार्थ वाटण्याचे माझे हे दिवस नाहींत. अरे, ती शिकार कसली ? पोरखेळच तो ! आणि तसें म्हणशील, तर अलीकडे या बाजूला कोल्हें सुद्धां फिरकत असेल, असें मला वाटत नाहीं. माझा इकडे मधून मधून संचार असल्यामुळें त्या साऱ्या गुलामांनीं या रानांतून जणूं पळच काढला आहे ! ”

“ पण तें काय हो ? ” लांब अंतरावरून कोणी तरी कोल्ह्याएवढा प्राणी हळूहळू चालला आहे असें पाहून मी म्हणालों.

“ आं ! ! ” भास्करभाऊ एकदम घाबरून म्हणाले. “ कोठें रे ? कोण आहे म्हणतोस ? ”

“ तें—तें पहा ! ”

“ होय होय. दिसतें आहे खरें. पण तें कोण बरें असावें ? मला वाटतें रानडुकर चाललें असेल. ” भास्करभाऊ म्हणाले.

“ छे ! एखादें कुत्रें नाहीं तर मांजरसुद्धां असेल. अहो तें केवढेंसें आहे आणि चाललें आहे तरी कसें एकेक पाऊल मोजीत पहा ! ”

भास्करभाऊंनीं पुन्हां एकदां न्याहाळून पाहिलें आणि त्यांनाही माझी कल्पना पटलीसें दिसलें. पण तसें न दर्शवितां ते म्हणाले " छे ! तुला अनुभव नाहीं. तुम्ही बोलून चालून मुंबईचीं माणसें. तुम्हीं डुकर कधीं पहाणार ? आणि इतक्या अंतरावरचा प्राणी ओळखणेंही सरावावांचून कठीण आहे. अगदीं नक्की डुकरच तें. किती भयंकर प्राणी ! आणि बराच लांबही आहे. पण प्रयत्न करून पाहूं. कां ? तूं भ्यालास कीं काय ?"

" छे !......"

" अरे भिण्याचें मुळींच कारण नाहीं. मी असल्यावर डुकर काय, पण मोठा वाघ आला, तरी कोणालाही भिण्याचें कारण नाहीं ! " भाऊ मला पुरतें बोलूं न देतां म्हणाले आणि त्यांनीं लटपटणाऱ्या हातांनीं बंदूक धरून तिचा चाप ओढला !

" पाहिलेंस ? गोळी नेमकी वर्मीं लागलेली दिसते ! "

" शक्य नाहीं ! " मी माझें हंसें दाबण्याचा निष्फळ प्रयत्न करीत म्हटलें. कारण बंदूक अगदीं बरोबर उलट दिशेला उडालेली मी प्रत्यक्ष पाहिली असल्यामुळें, समोरच तो प्राणी घायाळ होणें ही गोष्ट केव्हांही शक्य नव्हती. पण भास्करभाऊ ही गोष्ट मुळींच कबूल करीतना !

" अरे शक्य नाहीं काय ? तो पहालास डुकर कसा आतां धडपडत आणि अडखळत चालला आहे तो ? पहा पहा. तो गतप्राण होऊन पडलाच."

" मग आपण त्याच्याजवळ जाऊन बघूं तरी कोण आहे तो ! " मी म्हटलें. तो प्राणी चालण्याचा बंद झाला होता खराच ! मला सुद्धां पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें.

" छे छे ! त्याच्याजवळ जाण्यांत शहाणपणा नाहीं ! आणि आपल्याला तेवढा वेळही नाहीं. भलत्या भानगडींत पडूं नको. मग आपण परत येऊन काय आहे तें हवें तर पाहूं !" भाऊ म्हणाले आणि लगेच ते तडक घराच्या मार्गालाही लागले. त्यामुळें माझाही नाइलाज होऊन मी त्यांच्या

मागोमाग गेलों. पण गांवांत गेल्याबरोबर मी ही बातमी एकदोघांना सांगितली. पण कोणाचाही या गोष्टीवर विश्वास बसेना ! आणि खरें पुसाल, तर माझाही या गोष्टीवर काडीचा देखील विश्वास नव्हता. म्हणून, या गोष्टीचा शहानिशा करण्याकरितां गांवांतील जीं पोरें तिकडे निघालीं, त्यांच्याबरोबर मीही तिकडे गेलों.

मी अगदीं बरोबर त्या जागीं त्या मंडळीला घेऊन गेलों. पण आम्हीं पहातों तों काय ? ती शिकार म्हणजे एक मरतुकडें कुत्रें होतें ! रोगानें जर्जर झालेलें तें कुत्रें धडपडत जात असतां शेवटीं गतप्राण होऊन आपोआप तेथें पडलें असावें. पण भास्करभाऊंनीं बंदूक झाडायला आणि तें कुत्रें असें पडायला एकच गांठ पडल्यामुळें त्यांना वाटलें तें आपल्या गोळीलाच बळी पडलें ! तें डुकरही नव्हतें, आणि भास्करभाऊच्या पराक्रमामुळें तें मेलेंही नव्हतें ! भाऊंनाही या गोष्टीची जाणीव असावी ! कारण म्हणूनच, तो प्राणी कोण असावा हें पहाण्याच्या फंदांत ते बिलकूल पडले नाहींत !

मग काय विचारतां ? त्या पोरांना ही भास्करभाऊंची शिकार म्हणजे माकडाहातीं कोलीत दिल्याप्रमाणेंच झाली ! आणि त्या कुत्र्याचा तो अस्थिपंजर ओढीत आणून त्यांनीं त्याची सगळ्या गांवांतून मिरवणूक काढली ! मधून मधून " **भास्करभाऊंची शिकार !** " अशी आरोळीही ते ठोकीत होते !

या एकंदर प्रकारानें झालें काय, तर तो सगळा राग भास्करभाऊंनीं माझ्यावर काढला ! गांवांत पोरांसोरांना ही हकीगत सांगून त्यांना तिकडे घेऊन जाण्याची उठाठेव मला सांगितली होती कोणी, असा त्यांचा माझ्यावर आरोप होता ! मी त्यांचें पुष्कळ समाधान करण्याचा यत्न केला, पण त्यांचा राग कांहीं केल्या शांत होईना ! या गोष्टीला आतां बरेच दिवस होऊन गेले. पण अजून भाऊंचा राग घालविण्याची युक्ति मला सांपडली नाहीं ! नाइलाज आहे !

---

# तिंबूनानांचा नवा शोध.

हे वसंतऋतो ! तुझें वर्णन करण्यांत आजपर्यंत सर्व कविश्रेष्ठांनीं आपली लेखणी झिजविली आहे. वेद आणि उपनिषदादि ग्रंथ ज्याप्रमाणें परमेश्वराचे स्वरूपचिंतनास वाहिलेले आहेत, त्याप्रमाणें अनेक सुंदर काव्यें केवळ तुझ्या स्वरूपचिंतनांत कांठोकांठ भरून गेलेलीं आहेत.

मदनाच्या साम्राज्यांत तर प्रमुख अमीर उमरावांत तुझी गणना होते. इंद्राच्या सुंदर अप्सरांनीं मोठ्या मी मी म्हणविणाऱ्या तपस्व्यांची तपश्चर्या मातीमोल केली खरी. पण या बिकट कामीं त्यांना तुझी महत्वाची मदत झालेली आहे ! किंबहुना तुझ्या मदतीवांचून त्या पाऊलच उचलत्याना ! जमिनींत बीं पेरण्यापूर्वीं, प्रथम तीं नांगरून ठेवावी लागते. आणि लष्कर कूच करण्यापूर्वीं सॅपर्स आणि मायनर्सकडून अगोदर मार्गांतील अडचणी काढून टाकाव्या लागतात. त्याप्रमाणें मेनकेसारख्या अप्सरासुद्धां तपोवनांत प्रथम तुझीच रवानगी करितात !

तुझें आगमन झालें, म्हणजे सृष्टीचा नूर एकदम बदलून जातो. आणि तारुण्यप्रदेशांत प्रथम पदन्यास करणाऱ्या नवयुवतीप्रमाणें सृष्टीवर एकदम अपूर्व टवटवी येते ! वृक्षलतांना कोमल पालवी फुटते, आणि ते फळाफुलांनीं अगदी भरून गेल्यामुळें त्यांना अपूर्व शोभा येते. आणि सायंकाळच्या वेळीं त्यांच्या मधुर वासानें भरलेला असा जेव्हां मंद मंद वायु वाहूं लागतो, तेव्हां दिवसभराच्या उन्हाळ्यानें संत्रस्त झालेले जीव जणुं स्वर्गसुख भोगूं लागतात ! विलासीजनांना तर वसंत काल ह्मणजे महापर्वणी ! ज्यांच्या अंगांत तारुण्याचा बहर आहे अशांची गोष्ट तर राहोच, पण—

वसंतीं बघुनि मेनकेला ।
गाधिज मुनिनें निजसुतपावरि उदकांजलि दिधला ! ॥

अर्थात् मेनकेच्या या यशाचा योग्य वांटा वसंताला दिलाच पाहिजे.

वसंताच्या आगमनानें जसा आंब्याला मोहोर येतो, आणि सर्व वृक्षलतांना जसा फळाफुलांचा बहर येतो, तशी कवींच्या प्रतिभेलाही एकदम भरती चढते. आणि कोकिल आपल्या गोड आलापांनीं जसें सारें रान दणाणून सोडतो, तसा कविही आपलीं सुंदर आणि गोड काव्यें निर्माण करून रसिकांचीं अंतःकरणें आनंदानें भरून टाकतो.

वसंतऋतूनें ऋषींच्या तपोवनांत अगोदर प्रवेश करणें, आणि मागून अप्सरांनीं येऊन त्यांच्या तपश्चर्येचा नाश करणें, हीसुद्धां एक सुंदर कविकल्पनाच आहे. तरुणीचें मनोहर सौंदर्य, आणि वसंतकाल, हीं विरक्त पुरुषांनासुद्धां मोहून टाकतील. मग इतरांची गोष्ट कशाला ? इतकाच वरील गोष्टीचा तात्पर्यार्थ. प्रत्येक विरक्त थोर पुरुष वसंतऋतूंत उन्मत्त बनून जातो, असा कांहीं कवींच्या म्हणण्याचा हेतु खचित नव्हे ! तसें असतें, तर वसंताचें आगमन म्हणजे एक मोठी आपत्ति समजून, त्याच्यावर पिकेटिंग करण्याचीच पाळी आली असती !

हें आमचें मत झालें. पण आमचे मित्र वे. शा. सं. तिंबूनाना यांचें मत आमच्याहून अगदीं वेगळें आहे. वसंतऋतूच्या सहाय्यानें अप्सरांनीं अनेक ऋषींचें तप कवडीमोल करून टाकल्याच्या पुराणांतरीं असलेल्या सर्व कथांचा त्यांनीं काळजीपूर्वक अभ्यास करून असा निष्कर्ष काढला, कीं प्लेग किंवा इन्फ्लुएन्झा असल्या प्रचंड सांथींपेक्षांही ‘ वसंत ’ जास्त भयंकर आहे ! कारण या सांथी मनुष्याचा फक्त प्राणच हरण करितात. पण हा वसंत तर प्राणापेक्षांही श्रेष्ठ असें जें मनुष्याचें तप अथवा शील त्यावरच गदा आणतो ! तस्मात् वसंत हा त्यांहूनही अधिक घातक होय !

दारूवरील पिकेटिंगसंबंधानें आमचें बोलणें चाललें असतां तिंबूनाना एकदम उसळून म्हणाले—‘ अगोदर वसंत ऋतूवर पिकेटिंग करा ! ’

त्यांचें हें म्हणणें आम्हांला मोठें चमत्कारिक वाटलें. आणि तिंबूनानाची आम्हांला कींव आली. पण उलट तिंबूनानाच आमच्या अज्ञानाची कींव करीत होते.

नंतर वर्ष सहा महिने तिंबूनानांनीं या विषयाचें नांव काढलें नाहीं. मात्र ते एकांतांत बसून तासचे तास कांहीं तरी विचार करीत बसलेले असत. आणि मधून मधून कांहीं टिपण करून ठेवीत. आम्हांला वाटलें, कीं तिंबूनानांचें हें वसंतऋतूबद्दलचें वेड आतां गेलं असून, ते आपला हा उतारवयाचा काळ ईश्वरचिंतनांत घालवीत असावेत. आमच्या या वृद्ध स्नेह्यावरचें एक हें गंडांतरच टळलें, अशा समाधानांत आम्हीं होतों ! परंतु तिंबूनानांच्या आणि आमच्या दुर्दैवानें आमचा हा अंदाज साफ चुकल्याचें मला एक दिवस आढळून आलें !

वसंतऋतूस नुकताच आरंभ झाला होता. अशा वेळीं एक दिवस अगदीं सकाळींच तिंबूनानानीं मला हांक मारली. त्याबरोबर आश्चर्यानेंच मी त्यांच्या खोलीकडे वळलों. कारण आज बरेच दिवस ते आमचेजवळ एक अक्षरही बोलले नव्हते. मी त्यांच्याजवळ बसल्याबरोबर ते म्हणाले—

‘ शेवटीं एकदां माझ्या श्रमांचें सार्थक झालें ! ’

‘ कशाविषयीं तुम्हीं बोलतां नाना ? ’ मी आश्चर्यानें विचारलें.

‘ मनुष्याचें मन भडकवून टाकणारा जो वसंतऋतु त्यापासून मानवजातीचें रक्षण करण्याचे बाबतींत कोणते उपाय योजावे, या विवंचनेंत मी इतके दिवस होतों. त्यासंबंधानें बारकाईनें आणि शोधपूर्वक इतके दिवस विचार केल्यावर या सांथीवर कांहीं प्रतिबंधक उपाय मळा सांपडले ! प्रभूची कृपा ! दुसरें काय ? ’ नाना विजयी मुद्रेनें म्हणाले.

‘ नाना, काय बोलतां काय तुम्हीं हें ? वसंतऋतु म्हणजे काय एखादी रोगाची साथ आहे ? तुम्हांला वेड तर नाहीं लागलें ? अहो, ‘ वसंत ’ ही एक ईश्वराची फार मोठी देणगी आहे. ज्या वसंतऋतूची आम्ही अगदीं उत्सुकतेनें वाट पाहत असतों, त्या वसंताला—निसर्गाच्या त्या उदार देणगीला तुम्हीं रोगाची साथ म्हणतां ! तेव्हां तुम्हांला काय म्हणावें ? ’

“ महान् शोधक ! आणि देशावर उपकार करणारा सत्पुरुष ! ” नाना

हंसत म्हणाले. ' अरे कदाचित् तुम्हांला माझें हें म्हणणें आज पटायचें नाहीं. पण शेवटीं सत्याचाच जय होणार ! "

तिंबूनानांशीं या विषयावर बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं, असें ठरवून मी स्वस्थ बसलों. पण नाना कांहीं स्वस्थ बसले नाहींत. लवकरच त्यांनी या विषयावर एक जाहिर व्याख्यान दिलें आणि त्यांत खालील अपूर्व सिद्धांत श्रोत्यांस सांगितले.

" वसंतऋतु हा मनुष्यास उन्माद आणून अनाचारास प्रवृत्त करणारा एक रोग आहे ! याचा अंमल हिंदुस्थानावर दरवर्षी दोन महिने असतो. ही साथ दरवर्षी नियमितपणें येणारी असून, ती अजीबात नष्ट करणें मानवी सामर्थ्याबाहेरचें काम आहे. तथापि वसंताचें आगमन होण्यापूर्वी जीं चिन्हें होतात, त्यांच्यावर बारकाईनें लक्ष ठेऊन, आह्मीं महत्प्रयासानें शोधून काढलेले उपाय योजावे. ह्मणजे बहुधा त्यापासून बाधा होणार नाहीं. वसंताची धाड येण्यापूर्वी पुढील चिन्हें दृष्टीस पडतात.

१ आंब्यांना मोहोर येऊं लागून त्याचा सुवास सर्वत्र पसरतो.

२ जाईजुई वगैरेना फलांचा अगदीं बहर येतो.

३ कोकीळ नांवाचा एक काळा पक्षी अशुभ स्वरानें ओरडूं लागतो.

४ सकाळीं व संध्याकाळीं मोहित करणारे असे वारे सुटतात.

हीं लक्षणें होऊं लागलीं, म्हणजे वसंताची सांथ लौकरच सुरू होणार म्हणून निश्चित समजावें ! आणि आम्हीं खालीं दिलेल्या सूचनेप्रमाणें अक्षरशः वागावें. या रोगाची बाधा लहान मुलामुलींना होत नसून, विशेषतः तरुण मुलांमुलींसच होते. म्हातारीं माणसेंसुद्धां याच्या या तावडींतून सुटत नाहींत ! तेव्हां तरुणांनीं तशाच वृद्धांनींही खालील सूचना अमलांत आणाव्या.

१ वसंताचीं वरील लक्षणें दिसतांच आंब्यांना आलेला मोहोर झोडपून पाडून टाकावा. पुढें आंबे खायला मिळणार नाहींत या मोहांत गुंतून फसूं नये !

२ ज्या झाडांना वसंतांत पालवी फुटत नाहीं, आणि फुलें येत नाहींत, अशाच झाडांची लागवड घराच्या आसपास करावी. निवडुंगाची लागवड करणें फार प्रशस्त !

३ कोकीळ या नांवाचा काळ्या रंगाचा व कुहु कुहु असा गोड स्वर काढणारा एक भिकारडा पक्षी आहे ! त्या पक्ष्यांस रॉकेलचे रिकामे डबे वगैरे वाजवून, घालवून देण्याचा प्रयत्न जारीनें करावा ! प्लेगच्या दिवसांत उंदीर हे जितके भयंकर आहेत, तितकाच या वसंताच्या सांथीच्या बाबतींत हा पक्षी भयंकर आहे !

४ कावळ्यांना आपल्या घराजवळ वसाहत करण्यास उत्तेजन द्यावें. कारण या पक्षिश्रेष्ठांपुढें वसंताची कांहीं एक मिजास चालत नाहीं !

५ संध्याकाळच्या वेळीं रम्य अशा एखाद्या उद्यानांत जावें, आणि त्यांतील एखाद्या उंच उडणाऱ्या कारंजापाशीं बसून जलतुषारांनीं थंडगार झालेला वारा मजेनें खात बसावें, असा मोह या सांथीच्या दिवसांत होतो. पण मनोनिग्रह करून, या वसंतऋतूच्या दिवसांत संध्याकाळच्या वेळीं मुळींच घराबाहेर पडूं नये. आणि दिवसभराच्या कडक उन्हाळ्यामुळें कितीही जीव कंटाळला असला, तरी ज्यास आपलें कल्याण व्हावें असें वाटत असेल, अशा पुरुषानें ती सायंकाळची वेळ घरांत बसूनच काढावी. कारण या वेळीं सांथीचा जोर विशेष असतो ! एखाद्याला फिरायला जाण्याचा शोकच असेल, तर त्यानें दुपारीं बारा ते दोनच्या दरम्यान थोडी सहल केल्यास चिंता नाहीं !

६ स्त्रियांनीं आणि विशेषतः तरुण व सुंदर स्त्रियांनीं तर या दिवसांत कोणाच्या दृष्टीस न पडण्याची चांगली खबरदारी घ्यावी. त्यांनीं घराबाहेर कधींही न पडणें हा उत्तम पक्ष. पण अगदीं नाइलाजच झाला, तर पासोडीसारख्या जाड कपड्याचा बुरखा—अगदीं पायांपासून डोक्यापर्यंत—घेऊन जावें. उकडतें किंवा जीव गुदमरतो असल्या क्षुल्लक सबबीवर आमच्या या सूचनेची हेळसांड करूं नये.

७ या दिवसांत अंगाला थंड व सुवासिक पदार्थांची उटी लावण्याची आणि खिडक्यांना वाळ्यांचे पडदे, वर पाणी शिंपडून लावण्याची सक्त मनाई आहे.

आमच्या या सूचनांबरहुकूम जो या दिवसांत आपलें कडक आचरण ठेवील, त्याला वसंतापासून कांहींएक बाधा होणार नाहीं, याची हमी आम्हीं घेतों. "

तिंबूनानांच्या व्याख्यानांतील इत्यर्थ हा असा होता. व्याख्यान संपल्याबरोबर एखाद्या विजयी योध्याप्रमाणें सगळ्या श्रोतृवर्गावर एक दृष्टिक्षेप टाकून नानांची स्वारी खालीं बसली. त्यांना वाटलें, कीं आपण लाविलेले हे अपूर्व शोध आपण लोकांपुढें मांडले, ह्मणजे आपला एकदम जयजयकार होईल. लोक आपणांस धन्यवाद देतील, आणि असा पुरुष हिंदुस्थानांत निपजला, याजबद्दल ईश्वराचे उपकार मानतील !

पण प्रकार अगदीं उलटा झाला ! व्याख्यान ऐकून लोक आपले खद्खदां हंसायलाच लागले. पोरेंसुद्धां तिंबूनानांकडे पाहून माकडचेष्टा करूं लागली. ' कांहीं शंका आल्यास खुशाल विचारा. ' असें तिंबूनानांनीं उभें राहून सांगितलें. पण त्यावर एक आडमुठा मनुष्य मोठ्यानें ओरडला, ' शंखाला शंका तरी कसली विचारायची ! ' दुसरा एक म्हणाला, ' निवळ पशु आहे ! ' तिंबूनानांची अशी अटकळ होती, कीं आपण आपले हे अपूर्व शोध लोकांपुढें मांडले, ह्मणजे लोक आपले इतके आभारी होतील, कीं आपल्या गाडीचे बैल सोडून टाकून लोक ती स्वत: ओढून नेतील. पण तसें कांहीं न होतां उलट तिंबूनानाच गाडीला जोडण्याच्या लायकीचे आहेत, असलीं उद्दामपणाचीं आणि मूर्खपणाचीं उत्तरें लोकांच्या तोंडांतून बाहेर पडलीं !

कांहीं टारगट लोकांनीं तर असाही बूट काढला, कीं तिंबूनानांना येथून परस्पर एकदम ठाण्याच्या वेड्यांच्या इस्पितळांत रवाना करावें ! दुःखांत सुख एवढेंच, कीं त्या चांडाळचौकडीच्या जवळच मी उभा असल्यामुळें त्यांचा तो

बेत माझ्या कानावर पडल्याबरोबर, मी तडक तिंबूनानांकडे जाऊन त्यांच्या कानावर ती गोष्ट घातली. आणि नानाही व्यासपीठावरून मागच्या मागेंच घराकडे पळाले. ते मग आठ दिवस घराच्या बाहेर कसे ते पडलेच नाहींत !

सभेंत घडलेल्या या विलक्षण प्रकारामुळें तिंबूनाना अगदीं संतापले असतील, आणि निराश होऊन गेले असतील, असें मला साहजिकच वाटलें. आणि त्यांच्या घरीं जाऊन, त्यांना दोन शांतवनपर शब्द सांगावे अशा इराद्यानें मी त्यांच्याकडे गेलों; आणि हळूच दारांतून डोकावून पाहिलें; तों काय स्वारी आपली आनंदांत बसलेली दिसली ! जसें काय कांहीं कमीअधिक घडलेंच नाहीं ! नानांचा तो विवेक आणि शांतता पाहून ‘ धन्य या सत्पुरुषाची ! ’ असेच उद्गार कोणीहि काढले असते.

“ नाना ! लोक अजून अज्ञान आहेत. ” मी आंबट चेहरा करून घोगऱ्या आवाजांत बोलण्याला आरंभ केला. पण मला पुढें बोलूं न देतां नाना मध्येंच म्हणाले—

“ ए: ! अरे हें चालायचेंच. ग्यालिलिओ, सॉक्रेटीस यांचा असाच छळ झाला. अरे आरंभीं हें असेंच व्हायचें. म्हणून धीर सोडायचा आहे कीं काय ? तूं त्याचें आपल्या मनाला लावून घेऊं नको...”

वास्तविक तिंबूनानांचें सांत्वन करायला म्हणून मी आलेला. पण उलट तिंबूनानाच जेव्हां माझें सांत्वन करूं लागले, तेव्हां घाबरून मी तेथून पळच काढला ! !

# बदक चाळींतील गणेशोत्सव !*

“ शेवटीं प्रकरण पोलिसांत जाणार ! ” एक दिवस आमचे सावळ्याभाऊ घाबऱ्या घाबऱ्या येऊन आणि एक दीर्घ निश्वास सोडून ह्मणाले. त्यांचें वरील वाक्य ऐकून मीही अगदीं सर्द होऊन गेलों ! आणि ह्मटलेंः—

“ सावळ्याभाऊ, अरे ह्मणतोस तरी काय ? कोणतें प्रकरण पोलिसांत जाणार ? तुझेवर कांहीं किटाळ...”

“ छे छे ! ” सावळ्याभाऊ मध्येंच एकदम ह्मणाले. “ माझेवर कसलें किटाळ येणार आहे ? पण आमच्या गणपतीचें प्रकरण......”

“ गणपती ? हा कोण बुवा गणपती ?....”

“ अरे खुळ्या, गणपती कोण असणार ? गणपती ह्मणजे आमच्या चाळीची गजाननाची मूर्ति. ती बिचारी अजून त्या पनवेलकराचे कारखान्यांतच आहे ह्मणा ! अजून त्या बिचाऱ्या मूर्तीला भावी संकटाचा पत्ताही नसेल ! ” सावळ्याभाऊ ह्मणाले.

“ ह्मणजे तुमच्या चाळीतली गणपतीची मूर्ति का पोलिसांत जाणार ? त्या बिचारीनें काय केलें बुवा ? ”

“ आतां मात्र तूं मात केलीस !” तशा त्या संकटाचे प्रसंगी सुद्धां माझ्या बोलण्यामुळें सावळ्याभाऊंना हंसें आवरेना. ते पुढें ह्मणाले, “ अरे बिचारा गणपती काय करणार ? पण आम्ही त्याचे भक्त आहों ना दिवटे ! आम्हां भक्तांच्या पायीं त्याला पोलिस पहाण्याचा प्रसंग येऊन ठेपला आहे ! ”

“ हें बघ सावळ्याभाऊ, असं अभोगत बोलून तूं मला अधिकाधिक बुचकळ्यांत पाडूं नको. तुझ्या या बोलण्यावरून तुमच्या चाळींतल्या सार्वजनिक गणेशोत्सवाचा कांहीं तरी विचका झालेला दिसतो आहे. तर

---

* इ. सन १९२८ सालीं ( शके १८५० ) टिळक पंचांगांतील गणेशचतुर्थी व जुन्या पंचांगांतील ग. चतुर्थी यांच्यांत महिन्याचें अंतर पडलें होतें ! सदरहू हकीकत त्याच वेळची आहे.

मला ही सारी हकीगत तपशीलवार आणि पहिल्यापासून सांग पाहूं ? ”
मी सावळ्याभाऊचा हात धरून त्याला जबरीनें खालीं बसविलें. नुकतेंच आणलेलें फर्मास विड्यांचें बंडल सोडून त्यांतल्या दोन चार विड्या त्याच्यापुढें टाकल्या आणि आंत चहा टाकण्यासही सांगितलें. तेव्हां सावळ्याभाऊही जरा स्थिरावल्यासारखे दिसूं लागले आणि त्यांतली एक विडी शिलगावून त्यांनीं आपल्या हकीगतीस आरंभ केला.

पण सावळ्याभाऊंनीं सांगितलेली हकीगत लिहिण्यापूर्वीं प्रथम बदकचाळीसंबंधानें दोन शब्द सांगणें जरूर आहे. बाकी तसा विचार केला तर बदक चाळ आमच्या वाचकांना कांहीं अपरिचित नाहीं. कारण गेल्या वर्षीं बदक चाळीत जें धडाकेबाज ‘लोकमान्य–प्राशन’ झालें, त्यामुळें बदक चाळ, तींतील नागोपंतासारखे पुढारी, आणि त्यांची चळवळ करण्याची हातोटी, या गोष्टी आतां सर्वांस माहीत झालेल्याच आहेत. तेव्हां त्याच चाळींतली गणेशोत्सवाची हकीगतही किती महत्वाची असेल हें निराळें सांगायला नकोच. असो.

सावळ्याभाऊ म्हणाले—“ तसें म्हटलें, तर गेल्या वर्षींही गणेशोत्सवाचे वेळी आमच्या चाळींत भांडणें झालींच.—अगदीं कडाक्याचीं भांडणें झालीं. गणपतीची मूर्ती उंदरावर बसलेली असावी कीं वाघावर बसलेली असावी, पटकाबंद असावी की पगडीबंद असावी, मूर्तीचे मागें लावण्याचा पडदा खादीचा असावा, कीं विलायती असावा, कवितागायनाला ‘ काव्यजंगल ’ यास बोलवावें कीं ‘ काव्यदर्दुर ’ यास बोलवावें, त्यावेळीं चहा करावा कीं कॉफी करावी, असल्या अनेक मुद्यावर अगदीं हमरीतुमरीची भांडणें झालीं. आणि पुष्कळ वेळां आतां हा उत्सव मोडतो कीं काय अशीही शंका माझ्या सारख्या घाबरट माणसाला वाटली. पण त्या विघ्नहर्त्या गजाननाच्या कृपेनें, आणि नागोपंतासारख्या व्यवहार्य पुढाऱ्याच्या अगाध चालयांनें तो उत्सव तर कसाबसा पार पडला. पण यंदां मात्र प्रसंग त्याहूनही बिकट आहे. म्हणजे पूर्वींचीं भांडणें, उपभांडणें, पक्ष आणि उपपक्ष, हे आपापल्या पवित्र्यांत झगडायला उभे आहेतच, पण त्यांत आणखी पंचां-

गांनीं यंदा जी अद्भुत कारवाई केली, तीमुळें आमच्या उत्सवांत दुहीचा जणूं हिमालयच धाडकन येऊन पडला !

एकादें संकट येण्यापूर्वी प्रथम अपशकून होतात असें जें ह्मणतात, त्याचा अनुभव आमच्या या उत्सवाच्या बाबतींतसुद्धां आम्हांला आला. कारण, उत्सवाचे पूर्वीपासूनच आमचे चाळींतील धोंडभटजी ( ते स्वतः आपणांस धोंडशास्त्री ह्मणवीत असत ! ) पटवर्धन, यांनीं टिळक-पंचांग खपविण्यासाठीं जोराचा उद्योग चालविला होता. आणि 'टिळक-पंचांगच खरें आहे ' अशा मजकुराचीं लहान, मोठीं, सह्यांचीं आणि बिनसह्यांचीं छापील चिठ्ठोरींही ते चाळीच्या प्रत्येक खोलींत मधून मधून टाकीत असत. आमच्या चाळींतील दुसरे एक गृहस्थ श्री. जनोबा यांनीं जुन्या पंचांगासाठीं कंबर कसली होती आणि ' टिळक-पंचांग खोटें आहे ' अशा मजकुराचीं छापील पत्रकें वांटण्याचा त्यांनीं पण सपाटा लावला होता ! ते संतापानें ह्मणत, " या धोंडभटानें टिळक-पंचांगांचा एक गठ्ठा स्वस्तांत मिळवला असून, आतां तीं सगळीं पंचांगें खपून जावीं, म्हणून टिळक-पंचांगच खरें, म्हणून जिकडे तिकडे शंख करीत सुटला आहे ! नाहीं तर या मूर्खाला कोणतें पंचांग खरें आहे, हें समजण्याची थोडीच अक्कल आहे ! " उलट धोंडभटजी म्हणत-" माझें नाक कापावें, आणि पंचांगें माझ्या अंगावर पडावीं म्हणूनच केवळ जुन्या-पंचांगांचा एवढा कळवळा ह्या जन्याला आला आहे. नाहीं तर त्या बेट्याला थोडीच परीक्षा आहे पंचांगाची ? " त्यांचें हें भांडण पाहून एखादेवेळीं वैतागानें असेंही माझ्या मनांत येई, कीं सुंदोपसुंदांप्रमाणें यांच्या या लठ्ठालठ्ठींत जर हीं दोन्ही पंचांगें खोटीं ठरतील तर प्रजेला किती सुख होईल ?

प्रथम मला निदान एवढी तरी आशा होती, कीं हें पंचांगांचें भांडण धोंडभटजी आणि जनोबा यांचेंमध्येंच राहील. पण तसें कोठलें व्हायला ? श्रावण महिना उजाडला, आणि गणेशोत्सव जसजसा एकेक दिवसानें जवळजवळ येत चालला, तसतसा गणपतीचा उत्सव केव्हां करावा या

वादाला रंग येत चालला. केसरी गणपती—उत्सव टिळक-पंचांगाप्रमाणेंच करावा असें जोराजोरानें सांगत होता; तर आमच्या चाळीचें आवडतें पुणेरी पत्र जें भाला, त्यांत उत्सव जुन्या पंचांगाप्रमाणें करावा असें ठांसून येत होतें. त्यामुळें खुद्द ब्राह्मणमंडळींतसुद्धां धोंडभटजी आणि जनोबा अशा दोघांनाही भराभर अनुयायी मिळूं लागले. आणि एखाद्या रोगाच्या सांथी-प्रमाणें हें पंचांगांचें भांडण आमच्या सर्व चाळभर जोरानें पसरत चाललें! पुरुष, बायका, मुलें, सुशिक्षित आणि अशिक्षित मिळून झाडून सारीं माणसें, दिवसा आणि रात्रीं पंचांगांचें भांडण उकरून काढून हमरी तुमरीवर येऊं लागलीं! नळावर हींच भांडणें, ग्यालरींत हींच भांडणें, ट्राममध्यें याचीच बाचाबाची आणि मुलांच्या शाळेंत जातांना याचबद्दल मारामाऱ्या!

भांडणांची ही प्रगति पाहून धोंडभटजींना तर अधिकच हुरूप चढला आणि 'चाळीचा गणपती टिळक—पंचांगाप्रमाणें बसवावा' अशा मजकु-रावर त्यांनीं चाळींतील माणसांच्या सह्या घेण्याचा सपाटा चालविला! ज्यांना सही करितां येत नव्हती, त्यांचा आंगठा घेतला. आणि ज्यांना आंगठा पण लावतां येत नव्हता, अशा पोरांसोरांसाठीं त्यांनीं स्वतःचे आंगठे त्या यादीवर उठवले! आणि हर्षभरानें चाळीचे पुढारी नागोपंत यांना ती अगडबंब यादी त्यांनीं दाखविली. पण दुर्दैवानें त्याच वेळीं दे. भ. जनोबा यांनीं आंगठ्यांच्या असंख्य ठिपक्यांनीं चित्रविचित्र झालेली स्वतःची यादी जेव्हां बटव्यांतून बाहेर काढली, तेव्हां वे. मू. धोंडभटजींचे पायाची आग मस्तकाला चढून ते ओरडून ह्मणाले:—" हा निव्वळ चावटपणा आहे. "

'आणि तूं केलें आहेस तें काय आहे? तुला वाटलें या हातचलाख्या फक्त आपल्यालाच साधतात. पण बेट्या, या भ्रमांत राहून असा तोंडघशी पुनः पडूं नकोस! अरे ज्या गांवच्या बोरी, त्याच गांवच्या बाभळी! तूं महाराष्ट्रांतला असशील, तर मी बृहन्महाराष्ट्रांतला आहें! काय समजला आहेस!' जनोबा तितक्याच जोरानें गर्जना करीत ह्मणाले. इतक्यांत हां हां म्हणतां आणखीही कांहीं मंडळी तेथें जमा होऊन बाचाबाचीला अधिका-धिक रंग भरूं लागला. तेव्हां नागोपंत ह्मणाले—

'गड्यांनो, हा महत्वाचा वाद असा उभ्याउभ्यानें तुटणार नाहीं. त्याला सभाच भरविली पाहिजे. परवां शनिवारीं रात्रीं आपण आपल्या वाडीची सभा भरवून या प्रश्नाचा निकाल लावूं या.'

नागोपंतांचें म्हणणें मंडळीला पसंत पडलें. आणि शनिवारीं होणाऱ्या समरांगणासाठीं वाडींतला प्रत्येक वीर जय्यत तयारी करूं लागला ! शेवटीं सभेची वेळही येऊन ठेपली. आणि आमच्या त्या बदक चाळीचे समोरील पटांगणांत ती प्रचंड सभा भरली. नेहमींचे वहिवाटीप्रमाणें दे. भ. (?) नागोपंत हे अध्यक्षस्थानीं विराजमान झाले !

आमच्या त्या सभेंत दोन पक्ष तर उघडच होते आणि त्या त्या पक्षाचें प्रमुख लोकही वेगवेगळे गट करून बसले होते; टिळक–पंचांगवाल्यांचें धुरीणत्व धोंडभट पटवर्धन यांच्याकडे असून, जुनें पंचांगवाल्यांचे पुढारी जनोबा हे होते. आमचा खंडू सुतार अजून कोणत्याही पक्षाला न मिळतां आपल्या कांहीं सोबत्यांसह युद्धाचा रागरंग पहाण्यासाठीं निराळाच बसला होता !

सभेंत मंडळीची गडबड चालली आहे अशा स्थितींत धोंडभटांनीं आपला ठराव येणेंप्रमाणें सभेपुढें मांडला—"बदक चाळींतील यंदाचा गणेशोत्सव शुद्ध पंचांगाप्रमाणेंच करावा, असें या सभेचें मत......"

"हां ! थांबा ! धोंडूच्या शुद्ध या शब्दाला माझा जोराचा आक्षेप आहे." जनोबा उभे राहून मध्येंच ओरडले !

"हां हां !" नागोपंत म्हणाले. "जनोबा, त्यांना ठराव पुरता मांडूं द्या तरी."

"ठराव मांडूं द्या की; पण याला आपल्याच पंचांगाला शुद्ध म्हणण्याचा काय अधिकार ?"

"तें राहूं द्या. पण शिवाय तुम्ही त्यांना नुसतें धोंडू म्हणालांत ! हा शिष्टाचार नव्हे."

"मग काय म्हणूं ?"

" निदान धोंडशास्त्री तर म्हणाल ? "

" शास्त्री म्हणायला याला कोणतें शास्त्र अवगत आहे ? पण तुमचा आग्रहच असेल तर म्हणूं घटकाभर शास्त्री ! "

" बरें. धोंडशास्त्री, तुम्ही शुद्ध पंचांग न म्हणतां टिळक-पंचांग असें म्हणून आपला ठराव मांडा. " नागोपंत म्हणाले.

" बरें आहे. " धोंडभटजी म्हणाले. " वास्तविक टिळक-पंचांग हेंच शुद्ध पंचांग आहे. पण अध्यक्षांच्या मर्जीसाठीं मी 'टिळक-पंचांगाप्रमाणेंच' असें म्हणतों. आणि मी असा ठराव मांडतों, कीं आपल्या चाळींतील गणपतीचा उत्सव टिळक-पंचांगाप्रमाणें व्हावा. "

" काय म्हणून ? " एक गृहस्थ मध्येंच उभे राहून म्हणाले.

" काय म्हणून म्हणजे ? टिळक—पंचांग हेंच शुद्ध पंचांग आहे, म्हणून. " धोंडभटजी म्हणाले.

" तें कसें शुद्ध आहे, हें सिद्ध करा. जुनें पंचांगच शुद्ध आहे असें मोठमोठे विद्वानही म्हणत आहेत. आणि साऱ्या हिंदुस्थानांत जुनें पंचांगच चालू आहे. "

" हें पहा चिटकोपंत, " नागोपंत म्हणाले. " आपल्याला इतक्या खोलांत शिरण्याचें कारण नाहीं. कोणतें पंचांग खरें आहे, याला येथें बाहेरचे पुरावे नकोत. आपल्या मंडळींत येथें जें ठरेल, तेंच खरें धरून आपल्याला चालावयाचें आहे. "

" अगदीं खरें आहे ! आणि टिळक-पंचांग खरें आहे, हें सिद्ध करायला मोठमोठ्या पंडितांची मुळींच जरूर नाहीं. अगदीं ठोकळ प्रमाणांनींसुद्धां ही गोष्ट सहज सिद्ध करतां येईल. " बंडोपंत ह्मणाले.

" ती कशी काय ? " खंडू सुतारानें त्यांना प्रश्न केला.

" तें मीच सांगतों ! " बंडोपंत टकले आपल्या शरीराचें धूड उभें करण्याचा खटाटोप करीत असतांना ह्मणाले. " अहो, माझी एक लहानशी गोष्ट ऐका. ह्मणजे याचा स्वच्छ उलगडा होईल ! "

“ सांगा, सांगा ! ” गोष्टीवेल्हाळ पोरें मध्येंच ओरडलीं.

“ अलीकडे माझ्या खोलींत उंदरांचा किती सुळसुळाट झाला आहे, तें तुह्मांला वर्णन करूनही सांगतां यायचें नाहीं ! ”

“ कबूल ! पण तुमच्या खोलींतल्या उंदरांचा पंचांगांशीं संबंध काय ? ” खंडू सुतार आश्चर्यानें मध्येंच ह्मणाला.

“ फारच जवळचा संबंध आहे ! पण खंडोबा, तुह्मी गोष्ट पुरती ऐकून घ्या ! ” बंडोपंत ह्मणाले. “ अहो, ते उंदीर दिवसाढवळ्यासुद्धां खुशाल माणसांप्रमाणें आमच्या खोलींत वावरत आहेत. आणि ते आम्हांला भिण्याऐवजीं आम्हांलाच त्यांना भिऊन एखाद्या बिळांत दडण्याची वेळ आली आहे ! ”

‘ छान ! ’ बगुताईचा बगड्या हळूच म्हणाला.

‘ पण ते उंदीर किती धीट झाले आहेत, हें एखादी विशेष गोष्ट तुम्हांला सांगितल्याशिवाय बरोबर पटायचें नाहीं. म्हणून एक लहानशी गोष्ट तुम्हांला थोडक्यांत सांगतों. ’ बंडोपंत आधारासाठीं टेबलावर दोन्ही हात टेंकून जरा आडवे होत म्हणाले ! त्याबरोबर सारी सभा कान टवकारून गोष्ट ऐकण्यासाठीं अगदीं उत्सुक होऊन बसली.

‘ बंधूंनो, आणि भगिनींनो, ’ बंडोपंत पुढें बोलूं लागले, ‘काल रात्रींचीच गोष्ट. मी दिवा मालवून पांच मिनिटें होतात न होतात आणि माझा डोळा लागतो न लागतो, इतक्यांत उंदरांच्या येरझारा साऱ्या खोलीभर सुरू झाल्या. ते आपसांत भांडूंही लागले. आणि दोन मोठाले उंदीर तर माझ्या पोटाच्या दोन बाजूंनीं उभे राहून झोंबी खेळूं लागले ! ’

‘ वा ! खूप मजा उडाली ! ’ एकजण ओरडला. बंडोपंतांची ही गोष्ट ऐकून सभेंत पराकाष्ठेचा हंशा पिकला.

‘ त्यांतला एक उंदीर टिळक—पंचांगवाला असेल आणि दुसरा जुनें पंचांगवाला असेल ! ’ खंडू सुतारानें आपलें डोकें चालविलें.

‘ मग बंडोपंत, त्या झोंबींत त्यांतला कोणता उंदीर पडला ? ’

‘ अहो, उंदीर कसचा पडतो ? उंदीर कोणताच पडला नाहीं. पण त्यांच्या भांडणानें घाबरून मी मात्र खाटेवरून खालीं पडलों ! ’

पुन्हा एकदां जोराचा हंशा पिकला. पण इतक्यांत खंडू सुताराला मूळ मुद्याची आठवण होऊन तो लगेच म्हणतो–‘ पण बंडोपंत, यावरून टिळक—पंचांग खरें कसें ठरतें ? ’

‘ अरे तें तर आतां स्पष्टच झालें ! आतां तूंच सांग पाहूं, कीं गणपतीचें वाहन कोणतें ? ’

‘ उंदीर ! ’

‘ मग झालें तर ! कारण असें पहा, गेलीं दोन वर्षें मी पहात आलों आहें, कीं गणेशचतुर्थी जवळ आली, कीं आमच्या खोलींत उंदरांचा सुळसुळाट होतो. अगदीं ठरलेली गोष्ट ! हे बिनीचे स्वार असे बोकाळूं लागले, की समजावें, कीं गणपतीची स्वारी आठचार दिवसांत येणारच ! अगदीं पंचांगसुद्धां पहावयाला नको ! आतां पहा, टिळक पंचांगांतली गणेशचतुर्थी अगदीं नजीक आली आहे. तेव्हां हा उंदरांचा सुळसुळाट हीच गणेशचतुर्थी खरी हें दाखवीत नाहीं काय ? ’

‘ छे ! ’ जनोबा तुच्छतेनें हंसून म्हणाले. ‘असल्या पोरकट गोष्टीनें टिळक–पंचांग खरें ठरणार नाहीं. त्याला कांहीं तरी भक्कम पुरावा पाहिजे. ’

“ भक्कम पुरावा पाहिजे, तर हा घ्या भक्कम पुरावा. ” बाबूराव लटपटे ठांसून म्हणाले. “ पण हें बघा, तुमच्यांत थोडी श्रद्धा पाहिजे. म्हणजे माझा पुरावा तुम्हांला पटेल. ”

“ बोला, बोला, काय तें लवकर बोला ! ” एक कंटाळलेला श्रोता उद्वेगानें म्हणाला.

“ मित्रहो, स्वप्नांवर जरी तुमचा फारसा विश्वास नसला, तरी पहांटे पडणारी स्वप्नें तरी बहुधा खरीं ठरतात असें आपण पहातों. आणि माझें स्वप्न तर अगदीं उजाडत पडलेलें आहे ! दोन दिवसांपूर्वी श्रीगजाननाची मूर्ति अगदीं उजाडतां उजाडतां माझे स्वप्नांत येऊन गंभीर मुद्रेनें म्हणाली

बाबूराव, माझा उत्सव टिळकपंचांगाप्रमाणें करणें हेंच तुमचें कर्तव्य आहे. भलत्या लोकांच्या नादीं लागूं नका ! एवढें बोलून ती मूर्ति अंतर्धान पावली आणि मी जागा झालों ! तों पायांखालीं चांगलें दिसूं लागलें होतें. ”

“ मित्रहो, ” साबाजी थापाडे एकदम उभे राहून बोलूं लागले. “ माझे श्रद्धाळू मित्र श्री. लटपटे ह्यांनीं तुम्हांला आपल्या स्वप्नाची हकीकत सांगितली. पण तुम्हीं हें लक्षांत ठेवा, कीं आजचा काळ बाबावाक्यं प्रमाणं असा नसून, आजचा काळ म्हणजे चिकित्सेचा काळ आहे. म्हणून स्वप्नापेक्षां मी तुम्हांला एक शास्त्रीय पुरावा दाखल करतों, तो ऐका. प्लँचेट नांवाचें नवीन निघालेलें यंत्र तुम्हांला माहीत असेलच. या यंत्रावर स्वर्गांतला वाटेल तो गृहस्थ वाटेल तेव्हां खेंचून आणतां येतो. तेव्हां मीही एकदां श्रीगजाननाला यंत्रावर पाचारण केलें ! आणि त्या यंत्राच्या तडाख्यांत सांपडून गजाननमहाराज उंदरासह माझ्याकडे खेचले गेले. त्यांच्या मनांतून त्यावेळीं माझ्याकडे यावयाचें नसल्यामुळें स्वारी अगदीं क्रुद्ध झाली होती. त्यामुळें ‘ मला कां बोलावलेंस ? ’ असें संतापानें त्यांनीं विचारलें. तेव्हां मी भीत भीत म्हणालों महाराज, आपला उत्सव कोणत्या पंचांगाप्रमाणें करावा तें सांगावें. तेव्हां गजानन म्हणाले, अरे मंदबुद्धे, यांत काय विचारतोस ? तुमच्या नेहमींच्या पंचांगाप्रमाणें कर. तेव्हां मी म्हणालों, महाराज, पण धोंडशास्त्री म्हणतात, कीं टिळकपंचांगाप्रमाणें करावा. त्याबरोबर मंगलमूर्ति क्रुद्ध होऊन म्हणाले, मूर्खा, त्या धोंड्याला पंचांगांत काय कळतें ? त्या गुलामाला सत्तावीस नक्षत्रें तरी रांगेनें पाठ म्हणतां येतील का ? मग मी परत हळूच विचारलें, बाबूरावांच्या स्वप्नांत आपण सांगितलें कीं जुनें पंचांग खोटें आहे. तेव्हां गजाननमहाराज म्हणाले, त्या बाबूरावाच्या स्वप्नांत मी मुळींच आलों नाहीं. त्यानें भांगेच्या तारेंत कांहीं तरी पाहिलें असेल ! ”

‘ साबाजी थापाड्या, तुझ्या या प्लँचेटच्या थापा आतां बस कर. ’ धोंडभटजी संतापानें ओरडले.

'तुमच्या गप्पा मात्र खऱ्या, आणि माझें प्लँचेट मात्र खोटें, हा खासा न्याय आहे !'

'सभ्य गृहस्थहो !' नागोपंत सभासदांना शांत करीत म्हणाले. 'हा वाद अशानें तुटणार नाहीं. आतां असें करा, दोन चिठ्या देवापुढें ठेवा आणि त्यांतली एक मुलाकडून उचलवा. त्यांत जें येईल तें खरें.'

'बस्स. हा उपाय उत्तम. आणि कोणतें पंचांग खरें याचा पक्का उलगडा याच तोडग्यानें होईल ! परवांच मी केसरींत वाचलें, कीं कुठे जुन्नरला कीं काय, चिठ्या टाकल्या, तेव्हां देवानें टिळक—पंचांग खरें असें सांगितलें. आपल्याकडे असेंच झालें तर आपलें नांव केसरींत येईल !'

"आणि जुनें पंचांग खरें असें आलें, तर भाल्यांत येईल !" जनोबा म्हणाले.

झालें. लगेच दोन चिठ्या तयार करून त्या नागोपंतांचे खोलींतल्या दत्तापुढें ठेवल्या आणि त्यांतील एक चिठी बगड्यानें उचलली. ती जनोबांनीं उघडून वाचली, आणि आनंदभरानें उडी मारून 'जुनें पंचांग !' असें ओरडत त्यांनी नागोपंतांना दाखविली. पण पुढें हिसकाहिसकींत त्या चिठीची ओढाताण होऊन शेवटीं ती नापत्ताही झाली !

"असें कसें झालें ? जुन्नरचा देव नवें पंचांग खरें म्हणतो आणि हा मुंबइचा देव असें कसें सांगतो ?" खंडू सुतार म्हणाला.

'अरे ही मुंबई म्हणजे बोलून चालून बकाली; इथले देव तरी सुधे कोठून असणार ?' बाबूराव लटपटे म्हणाले.

'तें कांहीं नाहीं !' धोंडभटजी ओरडून म्हणाले. 'चिठी आम्हांला पहायला सांपडली नाहीं. तेव्हां हा निकाल आम्हांला मान्य नाहीं. पुन्हा चिठ्या टाका !'

'मी पुन्हा चिठ्या टाकूं देणार नाहीं !' जनोबा तितक्याच जोरानें ओरडले. 'देवाला पुन्हा पुन्हा त्रास देण्यांत काय अर्थ आहे ! असला अत्याचार मी मुळींच चालूं देणार नाहीं !

‘ अरे वेड्यांनो थांबा ! ’ एवढा वेळ गप्प बसलेले अंतूकाका म्हणाले. ‘ तुमच्या त्या चिठ्या राहूं द्या. आणि सगळेंच राहूं द्या. कोणतें पंचांग खरें हें ठरविण्याच्या भानगडींत तुम्ही मुळींच पडूं नका. तें काम तुमच्या आवांक्यांतलें नव्हे. ’

‘ मग हें काम कोण करील ? अंतूकाका, या वादाचा चोख निकाल कोण करील ? ’

‘ अरे, या वादाचा निकाल डुकर करतील ! ’

‘ काय डुकरें ? ’ सगळे लोक आश्चर्यानें ओरडले ! ‘ अंतूकाका, अहो म्हणतां तरी काय तुम्ही ! ’

‘ हो हो ! ’ अंतूकाका विजयी मुद्रेनें ठांसून म्हणाले. ‘ तुम्ही हा प्रश्न खुशाल डुकरांकडे सोंपवा ! गणेश-चतुर्थीचे दिवशीं चंद्राकडे पाहिलं असतां चोरीचा आळ येईल, म्हणून झाडून सारीं डुकरें त्या दिवशीं रात्रीं आपलीं तोंडें जमिनींत खुपसून बसतात ! तेव्हां तीं टिळक-पंचांगाप्रमाणें बसतात एवढें पाहिलें, म्हणजे आपोआप निकाल लागला. कारण तुमचें आमचें चुकलें, तरी डुकरांचें गणित चुकणें शक्य नाहीं ! ’

‘ अंतूकाका,’ साबाजी हंसत म्हणाला. ‘ पण चतुर्थीचे दिवशीं डुकरें तोंडें लपवून बसलेलीं तुम्ही कधीं पाहिलीं आहेत का ? ’

‘ छे ! पण मी पाहिलीं नसलीं तरी शिकारी लोक पहातात.’

‘ तुम्हीं कधीं डुकराची शिकार केलेली आहे का ?’

‘ नाहीं !’ एक सुस्कारा टाकून अंतूकाका म्हणाले. ‘ पण पोरांनो, इकडे मुंबईत डुकरें आहेत कुठें शिकार करायला ? नाहीं म्हणायला परवा एक घूस मात्र मी होलपटून टाकली ! ’

‘ भले बहाद्दर ’ पोरें ओरडलीं.

‘ पण अंतूकाका, तुमच्या बापजाद्यांनीं तरी कधीं डुकराची शिकार केली होती काय ? ’

‘ हा प्रश्न अप्रस्तुत आहे. ’ धोंडभटजींनीं बंडोपंतांच्या या प्रश्नाला हरकत घेतली.

‘ बरें, पण काय हो अंतूकाका, विलायतेंतील डुकरें पण गणेश–चतुर्थीला तोंड लपवून बसतात काय ?’

‘ छे छे ! ’ अंतूकाका नाक उडवीत ह्मणाले. ‘ त्या बिचाऱ्याना ही चंद्राची गोष्ट माहीत असेल कीं नाहीं कोण जाणे ! ’

‘ मग तीं डुकरें काय करीत असतील ! ’

‘ तें प्रभु येशूला ठाऊक ! ’ अंतूकाका म्हणाले.

‘ आणि मुसलमानी देशांतलीं डुकरें काय करीत असतील ? ’

‘ तें पैगंबराला माहीत ! ’ साबाजी ह्मणाला.

‘ गृहस्थहो,’ जनोबा बोलूं लागले, ‘ अंतूकाकासारख्या दीड शहाण्याच्या नादाला लागून हा प्रश्न डुकरांकडे सोंपवायला आह्मी तयार नाहीं. आमचीं हीं आपसांतलीं भांडणें आह्मी डुकरांसारख्या त्रयस्थांपुढें कां न्यावीं ? आणि त्याचा निकाल लावायला डुकरें तरी कशाला हवींत ? आम्हीं कुठें कमी आहों ? तें कांहीं नाहीं. चिठींत जुनें पंचांग आलें आहे, तेव्हां हा उत्सव जुन्या पंचांगाप्रमाणेच केला पाहिजे. टिळक–पंचांगाप्रमाणें तुम्ही कसा करता तेंच मी पाहतों ! ’

‘ आणि जुन्या पंचांगाप्रमाणें तुम्ही कसा करतां तें मी पाहतों ! ’ धोंडभटजी ठांसून म्हणाले. ‘ हें पहा, आम्ही कांहीं बांगड्या भरल्या नाहींत. आणि इंग्रजसरकारच्या कोर्टकचेऱ्याही कांहीं बंद पडलेल्या नाहींत ! ’

‘ तर मग होऊंच या तुमचे आमचे दोन हात ! ’

“ अहो जरा सबूर करा. ” एक म्हातारा कळवळ्यानें म्हणाला “ असे एकेरीवर काय येतां ? अरे, या तुमच्या भांडणांत उत्सवांत बखेडा माजतो आणि देवाची अप्रतिष्ठा होते, याची वाट काय ? तुम्ही देवाला सुद्धां कोर्टांत खेंचणार काय ? क्षुल्लक गोष्टीसाठीं आपली एकी कां बिघडवितां ?’

‘ कांहीं हरकत नाहीं! ’ धोंडभटजी आवेशानें म्हणाले. ‘ एकीची बेकी झाली तरी परवा नाहीं. पण आह्मी आपला हट्ट सोडणार नाहीं! आम्ही महाराष्ट्रीय एकीसाठीं धडपडणारे लोक नाहीं. आह्मी व्यवहार्य लोक आहों! आमचा इतिहास जगाला हेंच सांगत आहे आणि आमच्या आजच्या चळवळीही जगाला हेंच दाखवीत आहेत. अहो, हा बोलून चालून महाराष्ट्र आहे. इथें कोणी कोणाचें ऐकायचा नाहीं! ह्मणे साऱ्या हिंदुस्थानांत ह्या पंचांगांच्या मारामाऱ्या नाहींत. नसतील! पण आमच्या महाराष्ट्रांत आज दोन पंचांगें असून झिटाच्या कृपेनें उद्यां दोहोंचीं चार सुद्धां होतील! ”

“ पण धोंडभटजी......... ”

“ छे! तें कांहीं नाही. एकीच्या नादीं लागून आम्ही आमचें ब्रीद कधींही सोडणार नाहीं! वाटेल तो बखेडा झाला, तरी उत्सव आमच्या इच्छेप्रमाणें झाला पाहिजे. ”

‘ कधींही होणार नाहीं! ’ जनोबा संतापानें म्हणाले. पण पुढें त्या सभेंत एवढी गडबड उडाली, की कोणाचेंच बोलणें कोणाला ऐकूं येईनासें झालें! आणि जेव्हां लक्षणें ठीक दिसतना, तेव्हां नागोपंतांनीं टेबलावर उभें राहून सभा बरखास्त झाल्याचें जाहीर केलें! आणि मग बराच वेळ तो कलकलाट चालून शेवटीं मंडळीची पांगापांग झाली.

एवढी हकीगत सांगून पुढें सांवळ्याभाऊ एक दीर्घ सुस्कारा टाकून म्हणाले—‘ ह्या भांडणाचे पायीं उत्सवाची गत काय होते तें मात्र सांगतां येत नाहीं. कदाचित् दोन उत्सवही होतील, आणि कदाचित भांडणें कोर्टापर्यंत जाऊन उत्सव बंदही पडेल! काय होईल तें खरें. पण खरेंच सांगतों, महाराष्ट्रांत आधींच असलेले तट आणि भांडणें हीं थोडीं वाटलीं म्हणून का हा पंचांगांचा भस्मासूर आमच्या लोकांनीं उत्पन्न केला? ’

सावळ्याभाऊंचा प्रश्न सरळ होता. पण त्याला उत्तर देणें तेवढें सोपें नव्हतें! म्हणून सावळ्याभाऊंचा तो प्रश्न तसाच अधांतरीं लोंबत ठेवून मी दुसऱ्याच शिळोप्याच्या गोष्टी काढल्या!

# स्वर्गलोकची खबरबात !

चिटकोपंत आणि मिटकोपंत हे दोघे अगदीं दिलजान दोस्त. दोघेही एकाच गांवचे. दोघांचें शिक्षणही एकाच शाळेंत झालें. आणि दोघेही एकदमच मुंबईस नोकरीकरितां आले. पण ही त्यांची जोडी दुष्ट काळाला जणू पाहवली नाहीं. आणि एके दिवशीं त्यानें बिचाऱ्या मिटकोपंतावर झडप घालून त्याला परलोकीं नेलें.

या गोष्टीला जरी आज दहा वर्षें लोटून गेलीं होतीं, तरी मिटकोपंताचा विरह बिचाऱ्या चिटकोपंताला अजून नव्यासारखाच भासत होता. आणि त्यांतून आज ते मुंबईजवळ उतरलेलें विमान पहाण्याकरितां गेले, तेव्हां तर त्यांना स्वर्गवासी मित्राचें विशेषच स्मरण झालें. दोघांनाही विमानाचें विशेष कौतुक असल्यामुळें, विमानांचे फोटो अथवा विमानांची माहिती यांविषयीं दोघांनाही अतीशय कौतुक असे आणि कधीं काळीं हिंदुस्थानांत विमान आलें तर आपण त्यांत वाटेल तो यत्न करून बसूं, असें त्याचें ठरलें होतें. सुदैवानें, एक लहानसेंच का होईना, 'पण विमान तर हिंदुस्थानांत आलें. पण दुर्दैवानें, यमराजानें आपळं स्वर्गलोकचें विमान मिटकोपंताला एकाएकीं पाठविल्यामुळें, त्यांचा या मृत्युलोकांतील इंग्रजबहादुरांच्या विमानांत बसून फेरफटका करण्याचा बेत जागच्या जागींच राहिला ! स्वर्गलोक, यमपुरी, यमदूत आणि त्यांचीं विमानें इत्यादि गोष्टीविषयीं चिटकोपंताच्या मनांत विशेषशी श्रद्धा नव्हती. पण मिटकोपंताचें तसें नव्हतें. त्याचा या सगळ्या गोष्टींवर पूण विश्वास होता. आणि मरणोत्तर यमदूतानीं आपल्याला एखाद्या कुतरड्याप्रमाणें गळ्यांत दोरी बांधून फरफटवीत नेऊं नये, म्हणून ते अनेक व्रतें आणि वैकल्यें करीत असत आणि चिटको त्यांना कितीही हंसला, तरी त्यांनीं आपल्या या कार्यक्रमांत तिळभर देखील ढिलाई केली नव्हती ! " या तुझ्या पंधराशें व्रतांनीं यमराज खूष होऊन तुला लवकरच विमान पाठवतील ! आणि त्यामुळें तूं मात्र आम्हांला नाहींसा होशील ! "

असें चिटकोपंत आपल्या दोस्ताला थट्टेनें वारंवार ह्मणत असत. आतां त्यांच्या या ह्मणण्याप्रमाणें मिटकोला विमान आलें कीं नव्हतें कोण जाणें, पण चिटकोपंताला त्याचा दिलजान दोस्त नाहींसा झाला, एवढी गोष्ट मात्र खरी !

मिस्तर चिटकोपंत यांना मात्र मेल्यावर आपल्याला विमान येईल, याविषयीं तिळप्राय आशा नव्हती ! आधीं त्यांचा या गोष्टीवर भरंवसा नव्हता. आणि यदाकदाचित या गोष्टी जरी खऱ्या असल्या तरी आपल्याला विमान येईल, असें त्यांना स्वप्नांतसुद्धां कधीं वाटलें नाहीं. कारण तशी कांहीं पुण्याईच त्यांनीं कमावली नव्हती. त्यामुळें अभ्यासाचें पुस्तक चुकूनही न उघडणारा विद्यार्थी परीक्षेच्या रिझल्टाविषयीं जितका बेफिकीर असतो, तितकेच चिटकोही मेल्यावर दृष्टीस पडणाऱ्या विमानाबद्दल निर्धास्त होते ! व्रतें वैकल्यें आणि यज्ञयाग यांची गोष्ट तर राहोच, पण त्यांनीं कधीं संध्येचीं चार आचमनें टाकलीं असतील, अगर यमराज आणि त्याच्या पोलिसांची फौज यांना कधीं चार शितें टाकलीं असतील, तर अल्लाचें नांव ! त्यांचे कैलासवासी स्नेही श्रीयुत मिटको, हे अगदीं प्रातःकाळीं उठून जेव्हां भूपाळ्या किंवा व्यंकटेश स्तोत्र खड्या सुरांत ह्मणत असत, अगर शुचिर्भूत होऊन देवांवर अभिषेक घरीत असत, त्यावेळीं हे कर्मनष्ट आणि शिखानष्ट* चिटको अंथरुणांत घोरत पडलेले असायचे ! आणि कधींकाळीं त्या वेळीं उठलेले असलेच तर ' मूर्तिमंत भीति उभी ' किंवा ' बाई, अरसिक किती हा शेला ' असलीं स्तोत्रें खड्या आवाजांत ह्मणत, तोंडानें विडीचे झुरके आणि चहाचे भुरके घेत बसायचे !

एखादा पुण्यवान प्राणी मेला म्हणजे त्याला नेण्याकरितां यमदूत आणि विष्णुदूत यांची चांगलीच खडाजंगी उडते, आणि शेवटीं गोष्टी हातघाईवर येतात असें चिटकोनीं पुष्कळदां ऐकलें होतें. पण आपल्या मरणानंतर

* शिखानष्ट या शब्दाचा अवयवार्थ जो ' शेंडी नसणारा ' असा आहे, तोच या ठिकाणीं घ्यावा. ' मुसलमान ' असा घेऊं नये !

असला बाचाबाचीचा प्रसंग आपल्यावर ओढवणार नाहीं या विषयीं त्यांची खात्री होती ! त्यावेळीं विष्णुदूत तर आपल्या बाजूला नुसता फिरकणार-सुद्धां नाहीं, हें त्यांना पक्कें माहीत होतें. मग तो यमदूतांशीं हमरीतुमरीवर येण्याची गोष्टच बोलायला नको ! मेल्यावर यमदूतांची एक टोळी यावी, विष्णूनें आपली एक पलटण पाठवावी, मग त्यांनीं एकमेकांच्या अंगावर कचकचावें, त्या मेल्या जिवाची जीवतोड ओढाताण करावी, आणि त्या मृतानें ती आपली ओढाताण उघड्या *डोळ्यांनीं पहावी, असला अनर्थ आपल्या वेळीं होणार नाहीं, याबद्दल चिटकोंना कधींच शंका वाटली नाहीं. आपल्या मरणोत्तर फक्त यमदूतच आपल्याला न्यायला येणार. आतां त्यांच्यांत आपापसांत बिलकूल वाद होणार नाहीं असें नाहीं. पण झाला तरी " याच्या गळ्याला दोर बांधून न्यावा कीं तंगडीला बांधून न्यावा, " अशा तऱ्हेचा सौम्य स्वरूपाचाच होणार, हें चिटको जाणून होते !

याचें तात्पर्य एवढेंच, कीं मेल्यावर जरी स्वर्गांतून विमान येत असलें, तरी तें आपल्या वांट्याला कांहीं यायचें नाहीं, याविषयीं चिटकोपंतांची खात्री असल्यामुळें, मुंबईजवळ वरवा करून राहिलेल्या या विमानांतच बसून फेरफटका करण्याचें त्यांनीं आपल्या मनाशीं ठरविलें. चिटको असा बेत करीत आहेत, तोंच तें विमान त्यांच्या चाळीवरून घर घर असा आवाज़ करीत चाललें होतें. तो मोठा आणि विलक्षण आवाज कानीं पडतांच कित्येक माणसें रस्त्यावर जमा होऊन आकाशाकडे उंच माना करून पाहूं लागलीं आणि पोरें ' विमान ' ' विमान ' असें मोठमोठ्यानें ओरडून नाचूं लागलीं. ' विमान ' हा शब्द कानी पडतांच चिटको ताडताड उड्या मारीतच जिन्यावरून खालीं गेले. गेले कसले, धांवतांना पाय चुकल्यामुळें एक पाय जिन्याच्या पहिल्या पायरीवर, तर दुसरा एकदम शेवटल्या पायरीवर, अशीच त्यांची अवस्था झाली ! आणि या चमत्कारांत सांपडल्यामुळें

* ' उघड्या डोळ्यांनीं ' याचा अर्थ वाटेल तर ' मिटलेल्या डोळ्यांनीं ' असाही घ्यावा !

त्यांच्या शरीराचीही बरीच आदळ आपट झाली. पण त्यांचें तिकडे मुळींच लक्ष नव्हतें.

आणि खरोखरच ते जर यावेळीं देहावर असते, तर अशा स्थितींत ते खालीं रस्त्यावर येतेच ना ! ज्यावेळीं खालीं विमानाची ओरड झाली, त्यावेळीं त्यांची आंघोळ होऊन ते पंचानें अंग पुसण्याच्या उद्योगाला लागणार होते. पण 'विमान' हा शब्द कानावर पडतांच तो पंचा झटकन नेसल्यासारखा करून, ते बाहेरच्या खोलींत आले. अंग पुसण्याचें तसेंच राहिलें होतें. पण तिकडे लक्ष न जातां खालीं जाण्यापूर्वी डोक्याचे अस्ताव्यस्त वाढलेले रांठ केंस आणि प्रचंड मिशा हीं जरा विंचरून साफसूफ करून मग जावें असें त्यांनीं ठरविलें. आणि एका हातांत कंगवा आणि दुसऱ्या हातांत फुटकी आरशी घेऊन ते उभे राहिले. पण इतक्यांत 'विमान' ही घनघोर गर्जना आणि टाळ्या त्यांच्या कानावर येऊन आद-ळल्या. मग काय विचारतां ? रणभेरीचा आवाज ऐकतांच जसें वीराला स्फुरण चढतें, आणि कांहीं दिसेनासें होतें, तसेंच चिटकोपंताला झालें. आणि ते अगदीं तसेच दौडत जाऊन रस्त्यावर आकाशाकडे पाहात उभे राहिले !

रस्त्यावरील लोक आकाशांतील विमानाचें आश्चर्य पहाण्यांत गुंग झाले होते. पण चिटकोपंतरूपी नवें आश्चर्य भूतलावर उगवलेलें पाहून त्यांची दृष्टि तिकडे वळली. आणि हां हां म्हणतां त्यांच्याभोंवतीं मुलांमाणसांची गर्दी जमली ! चिटकोपंताचें ध्यान यावेळीं खरोखरच मनोहर दिसत होतें ! अंगावरून पाणी गळत आहे, मिशांच्या घनदाट जंगलांतून पाणी पाझरत असून विमानाकडे पाहात असतां आश्चर्यानें वांसलेल्या तोंडांत तें जात आहे, नेसूं फक्त वीतभर रुंदीचा ओला पंचा असून त्याचीं दोन्हीं टोकें जमिनीवर रुळत आहेत, आणि जिन्यावरून एकदम कोसळल्यामुळें त्या पंचाला आणि मांड्यांना मातीचीं सुंदर पुटें चढलीं आहेत, आणि एका हातांत दांते पडलेला कंगवा तर दुसऱ्या हातांत तळहाताएवढी फुटकी आरशी, अशीं आयुधें धारण केलीं आहेत, असें तें चिटकोपंताचें ध्यान

पाहून सर्व मंडळी अगदीं खूष होऊन गेली ! आणि एका चिटवळ पोराला एकदम काव्यस्फूर्ति होऊन, ' सुंदर तें ध्यान उभें सडकेवरी । हातीं कंगवा आरशी घेऊनीयां ॥ ' असा अभंगही त्यानें खड्या सुरांत म्हणून दाखविला ! तें नवरसात्मक काव्य, आणि त्यावर पिकलेला तो हंशा, यामुळें चिटकोंची अंतराळीं गेलेली दृष्टि खालीं आली. थोड्याच वेळांत सारा प्रकार त्यांच्या ध्यानांत आला आणि लोकांवर चरफडत चिटकोंची स्वारी आपल्या खोलीकडे तडक चालती झाली !

वरील प्रकार घडल्यानंतर चार आठ दिवस विमानाशिवाय दुसरें कांहीं एक त्यांना सुचत नव्हतें. कुठे घरघर आवाज कानांवर पडला पुरे; कीं कान टवकारून चिटकोपंत बाहेर धावलेच ह्मणून समजावें. एकदां तर विमानाचा भास होऊन भर मध्यान्ह रात्रीं ते रस्त्यावर धांवत गेले होते ! पुढें एक दिवस त्यांच्या कानावर असें आलें, कीं २५ रुपये फी घेऊन कोणालाही विमानांत बसून फेरफटका करतां येतो. ही बातमी कानावर पडतांच चिटकोंना किती आनंद झाला असेल हें सांगितलें पाहिजे काय ?

चिटकोपंतांनीं जीव म्हणून शंभर रुपये ब्यांकेंत ठेवले होते, ते त्यांनीं अगोदर काढून आणले. त्यांतले पंचवीस रुपये तर विमानाला फीच पडणार होती. शिवाय, विमानांत बसून वर गेल्यावर विलक्षण थंडी लागते, असें त्यांनीं कोठें तरी ऐकलें होतं. म्हणून प्रथम बाजारांत जाऊन त्यांनीं एक लोंकरीचा पायघोळ आंगरखा, आणि एक भक्कम कानटोपी शिवून आणली, आणि ते कपडे अंगाला कसे बसतात हें पाहण्यासाठीं त्यांनीं ते घरीं आल्यावर अंगांत घालून पाहिले. त्याबरोबर चिटकोंचें कुटुंब त्यांच्याकडे पहात उद्गारलें:—अहाहा ! काय पण छान दिसतें आहे ! एकदां आरशांत तरी पहा ! इश्श ! काय पण एकेक थेरें सुचताहेत नवीन नवीन ! वेडबीड नाहींना लागलें ? ही कुठली कपड्यांची तऱ्हा ? अणी या कडकडीत उन्हाळ्यांत हे लोंकरीचे जाड कपडे ! असले कपडे या दिवसांत अंगांत घालून हिंडलें तर गुदमरून जीव देखील जायचा ! ऐकलें का ? "



" सगळें ऐकलें. " लोंकरीच्या माकडटोपीचे कसे मानेभोंवतीं बांधीत, चिटकोपंत फुसकारले. " ह्मणे ऐकलें का ! काय ऐकायचेंय अन तुला काय त्यांत कळतें आहे ? असले कपडे घालून गेलें नाहीं, तर कडकडीत थंडींत मरायचें आहे कीं काय ? "

' कडकडीत थंडी ' चिमाबाई आश्चर्यानें ह्मणाल्या. " तर मग खरोखरच खूळ लागलें आहे असें दिसतें ! कुठल्या थंडींत आपल्याला जायचें आहे ? "

" तें तुला कळायचें नाहीं. आणि तें तुला सांगायचें पण नाहीं. तें राहूं द्या आतां. पण हें बघ, मी तुला आज तुझ्या भावाकडे पोंचविणार आहें. आपली तयारी करून ठेव. "

जे चिटकोपंत कांहीं झालें तरी आपल्याला माहेरीं पाठवायला तयार व्हायचे नाहींत, ते आज आपणहून आपल्याला आपल्या भावाकडे पोंचवण्यास तयार झालेले पाहून चिमाबाईला भारीच नवल वाटलें. आणि

आपल्या पतिराजांची स्वारी कोठें जाणार आहे याबद्दल तिनें त्यांना खोदखोदून अनेकदां विचारलें. पण चिटकोपंतांनीं तिला कांहींतरी चार थापा मारून तिला माहेरीं लावून दिलें. विमानाला अपघात होऊन आपण जर स्वर्गवासी झालों, तर मागें कांहीं भानगड होऊं नये, व आपल्याला काळजी लागूं नये, म्हणून त्यांनीं बायकोची रवानगी माहेरीं करून दिली होती. आतां दुसरी बाब ह्मणजे मृत्युपत्राची. पण मृत्युपत्र करण्याला चिटकोजवळ कांहीं इस्टेटच नसल्यामुळें त्या कटकटींतून त्यांची आपोआपच सुटका झाली !

अशा रीतीनें सर्व व्यवस्था झाली. पण इतक्यांत त्यांना एका गोष्टीची आठवण झाली. लहानपणीं शाळेंत असतां मराठी पांचव्या पुस्तकांत विमानाविषयीं जो एक धडा त्यांनीं वाचला होता, त्याची त्यांना यावेळीं एकदम आठवण झाली. त्यांत विमानांतून खालीं उतरतांना पॅराचूट नांवाची एक छत्री असते, ती उघडून विमानांतून खालीं उतरणारा एक मनुष्य दाखविला आहे, त्याचें त्यांना आतां स्मरण झालें. विमान जमिनीपर्यंत खालीं न येतां जर अधांत्री लोंबत राहिलें, तर आपल्यालाही छत्री उघडून विमानांतून खालीं उडी टाकावी लागेल, असा पोक्त अंदाज करून ते तडक बाजारांत गेले. आणि इब्राहिम छापाची चांगली सोळा ताड्यांची भलीभक्कम वाटरप्रूफ छत्री त्यांनीं खरेदी करून आणली !

नंतर विमानाच्या प्रवासाकरितां ह्मणून खास बनविलेला तो बनातीचा लाल अंगरखा आणि कानटोपी त्यांनीं परिधान केली. खांद्यावर ती नवी प्रचंड छत्री टाकली. पन्नास रुपयांचा कसा कमरेला कसून बांधला. आणि गोऱ्या रामाला व काळ्या रामाला नमस्कार करून त्यांनीं तडक वाट सुधारली. त्या विमानाच्या इंजिनीअरपुढें ते जाऊन उभे राहिले. आणि कमरेचा कसा सोडून त्यांतले एक जात पंचवीस सुरती रुपये वाजवून त्यांनीं त्याच्या स्वाधीन केले. आणि ह्मणाले—" कप्तानसाहेब, मला आपल्या विमानांतून देशपर्यटन करायचें आहे. त्याची ही फी घ्या."

चिटकोपंताचें तें विचित्र तोंड, तो चमत्कारिक पोषाख आणि खांद्या-वरची ती लांबलचक छत्री वगैरे सर्वच प्रकार त्या इंजिनीअरला विलक्षण वाटले. आणि तो म्हणाला—'मिस्टर, पण ही छत्री कशाला ?' आणि चिटकोपंतांनीं जेव्हां छत्रीचा उपयोग त्याला समजाऊन सांगितला, तेव्हां त्याची हंसून मुरकुंडीच वळली !

असो. चिटकोपंत विमानांत बसले, आणि तें विमान जेव्हां वर वर जाऊं लागलें, तेव्हां चिटकोपंतांना कळमळायला लागून एकदम चक्कर आली ! आणि त्यांतच ते जेव्हां बाहेर पाहण्याचा प्रयत्न करूं लागले, तेव्हां माथें फिरून ते जवळ जवळ बेशुद्धच पडले !

* * * * * *

पण त्या गुंगींत आपलें विमान अत्यंत वेगानें अगदीं वर वर जात आहे, असें त्यांना वाटत होतें. मोठेमोठे, डोंगरासारखे सोनेरी आणि रुपेरी ढग फोडून आपलें विमान सारखें वर चाललेलें ते पहात होते. तुटलेल्या ताऱ्यांचे तेजाचे झोत आपल्या डाव्या बाजूनें सणाणत खालीं जात आहेत, असेंही त्यांनीं पाहिलें. असल्या एखाद्या ताऱ्याशीं जर आपल्या विमानाची टक्कर झाली, तर आपल्या विमानाचे राईएवढे तुकडे होतील,—किंबहुना आपलें हें टीचभर विमान त्यांच्या तेजानें जळूनसुद्धां जाईल, असें त्यांना भय वाटलें. ही आपली धोक्याची सूचना ते आपल्या वैमानिकाला देणार, इतक्यांत त्यांचें तें विमान कशाला तरी आदळलें आणि कडडड असा प्रचंड ध्वनी होऊन तें पार मोडून गेलें !

बिचारे विमानांतील लोक विमानाचा जो भाग—जो तुकडा—हातीं लागला त्याला घट्ट बिलगून बसले होते. आणि झाडावरून गळून पडलेल्या एखाद्या वाळल्या पानावरील किडा जसा त्या पानाबरोबर हवा तिकडे भ्रमण करीत असतो, तसे ते लोक वातावरणांत हेलखावे खात जमिनीकडे चालले होते. पण आमच्या चिटकोंची गोष्ट अगदीं निराळी झाली होती ! विमान कशाला तरी आदळून जेव्हां मोडलें, तेव्हां त्या धक्यानें आमचे चिटको

एखाद्या रबरी चेंडूसारखे त्या विमानांतून हवेंत टुणदिशीं उडाले ! आणि पाण्यांत बुडालेल्या मनुष्याचें डोकें पाण्यावर निघालें, म्हणजे तो जसा धापा टाकीत आपले दोन्ही हात वर करतो, तसेंच त्यावेळीं अगदीं हुबेहूब चिटकोंनीं केलें आणि त्यांचें नशीब शिकंदर म्हणूनच कीं काय, त्यांच्या हाताला कायसें लागलें ! तें काय होतें, हें त्यांना समजलें नाहीं आणि वर मान करून पहाण्याच्या स्थितींतही ते नव्हते ! पण त्यांना जो अवचित आधार सांपडला, त्याला ओळखिंबा मारून लोंबकळत ते त्या स्वर्गीय वातावरणांत भ्रमण करीत होते !

थोड्या वेळानें मन थोडेंसें स्वस्थ झाल्यावर आणि हाताला पण बरीच रग लागल्यावर त्यांनीं वर पाहिलें, तों आपल्या डोक्यावर एक तेजःपुंज विमान असून, त्याच्या खुराला आपण लोंबकळत आहों, असें त्यांना समजून आलें ! आणि त्यामुळें त्यांना अतीशय आनंदही झाला. त्यांच्या विमानाला झालेल्या अपघातामुळें ते घाबरले होते, आणि कष्टीही झाले होते. पण आतां त्यांना आपलें विमान मोडून गेलें, हें आपल्या पथ्यावरच पडलें, असें वाटूं लागलें. आपल्याला देवांचें विमान पहावयास मिळालें, आणि विमानांतल्या देवाची मर्जी लागली, तर आपणांस बिन आयासानें स्वर्गही पहावयास सांपडेल अशी चिटकोंना आशा वाटली. सगळ्या गोष्टी खऱ्या, पण इकडे हाताला कळ लागून त्याचा तुकडा पडण्याची वेळ आली होती. त्यामुळें आंतील देवाला आपल्याला विमानांत घेण्याबद्दल विनंति करण्याचें त्यांनीं ठरविलें. पण देवांची भाषा कोणती हें चिटकोंना थोडेंच माहीत होतं ! पण देव हे बहुधा संस्कृत बोलत असावेत, अशा अजमासानें त्यांनीं

**भो त्राहि मां त्राहि मां**

अशी एकदम गर्जना केली ! त्याबरोबर विमानांतील देवानें चिटकोंना वर ओढून घेतलें. तें विमान इतकें मऊ होतें, कीं चिटकोंना आपण जणूं अधांतरींच बसलों आहों असें वाटलें. विमानांत बसल्याबरोबर आंतील देवाला

त्यांनीं अगदीं नम्रतेनें साष्टांग नमस्कार केला. त्याबरोबर तो देव खो खो करून खूप मोठ्यानें हंसला !

तो देव तेजःपुंज असून मऊ मखमालीसारखा आणि अनेक रंगांनीं खुलणारा असा त्याचा पोषाख होता. त्याच्या डोक्याला रत्नखचित मुकुट असून दोन्ही कानांवर दोन भलीं मोठीं कुंडलें लटकत होती ! पण तो देव आणि त्याचा तो पोषाख याहीपेक्षां त्याच्या त्या हंसण्याचें चिटकोंना जास्त आश्चर्य वाटलें ! आणि ते त्या देवाकडे आश्चर्यानें पहात उभे राहिले.

त्याबरोबर तो देव पुन्हां एकदां खूप मोठ्यानें हंसला आणि ह्मणाला—'चिटको, तूं मला ओळखलें नाहींस का ?'

देवाचें हें विपरीत विचारणें ऐकून चिटको जास्तच बुचकळ्यांत पडला ! आणि नम्रतेनें हात जोडून तो ह्मणाला—'देवाधिराज, म्या पामरानें आपल्याला कसें ओळखावें ?'

त्यावर देव तिसऱ्यांदा मोठ्यानें हंसला. आणि ह्मणाला—'चिटको, तूं या मिटकोला इतक्यांत विसरलास का ?'

'काय ? मिटको ?' आश्चर्यानें आ वांसून चिटको ह्मणाला. 'माझ्यासमोर बसलेला देव ह्मणजे काय मिटको आहे ?'

'होय. मित्रा, तुझ्या शेजारच्या खोलींत राहणारा तुझा मित्र मिटको, तो मीच. धार्मिक आचरणानें मी तूर्त हें देवपद पावलों आहें.' तो देवरूपी मिटको ह्मणाला.

'तूर्त ? ह्मणजे किती दिवस ?'

'पांचशें वर्षें ! पैकीं दहा वर्षें काढलीं ! अजून चारशें नव्वद वर्षें काढायचीं आहेत !'

मिटकोचें वरील बोलणें ऐकून चिटकोला कमालीचें आश्चर्य वाटलें ह्मणे दहा वर्षें काढलीं. जसा कांहीं तुरुंगांतच पडला आहे ! लोक स्वर्गलोकासाठीं जीव तोडीत असतात. आणि हा ह्मणतो 'दहा वर्षें काढलीं !'

शेवटीं चिटकोनें त्याला विचारलें—'मित्रा असें कां ह्मणतोस ? दहा

वर्षे काढलीं असे उद्गार कां काढतोस ? झावबाच्या वाडींत किंवा नांव निघाल्याबरोबर पोटांत धस्स होणाऱ्या धसवाडीसारख्या गल्लींतील एखाद्या दळभद्र्याच्या चाळींत रहायचें, आठ वाजतां कुत्र्यासारखें लगलग जेवायचें, हाडांच्या पिंजऱ्यावर कोटाची पाखर घालून टामरेळींत बसायचें, आणि हपीसांत जाऊन साहेबाच्या लाथा खायच्या, असा ज्यांचा कार्यक्रम अव्याहत चालला आहे, त्या आमच्यासारख्या लोकांनीं ' अमूक वर्षे काढलीं, ' असे उद्गार काढले, तर ते शोभतील. पण तुलारे काय ? चांगलें अमृत चांपायचें आणि विमानांत बसून यथेच्छ भटकायचें ! मग तुला असें बोलायचें कारण काय ? तुझें सुख दुखायला लागलें कीं काय ? '

" होय ! सुख सुद्धां दुखायला लागतें. निर्भेळ सुख मनुष्याला सुखी करीत नाहीं. मधून मधून तोंडी लावायला फोडणीच्या मिरचीसारखें दुःख हें पाहिजेच ! पण तुह्मां मानवांना या गोष्टी कशा कळणार ? आणि कळल्या तरी खऱ्या कशा वाटणार ? "

मिटकोच्या वरील उद्गारांवर चिटको कांहीं एक बोलला नाहीं. पण त्याला मिटकोच्या या बोलण्याचें अतीच आश्चर्य वाटलें. आणि ' एकूण स्वर्गातील देवसुद्धां तर मग सुखी नाहींत !' असे उद्गार त्यानें आपल्या मनाशीं काढले. पण मिटकोच्या या वरील बोलण्यावर अजून त्याचा विश्वास नव्हता. ' एक पुती रडे आणि सात पुती रडे ' त्यांतलाच हा प्रकार असावा असें त्याला वाटलें. जसें भिकारीही रडतो, आणि लाखोपतीसुद्धां ' पैशांची ओढ फार ' म्हणून ओरडत असतो, तशांतलीच हीही गत असावी अशी त्यानें आपल्या मनाची समजूत करून घेतली.

कांहीं वेळानें तें विमान एका सुंदर बागेवर येऊन थडकलें. आपल्या मृत्युलोकांत जसे गाड्या उभ्या रहाण्याचे स्टँड असतात, तशीच व्यवस्था तेथें विमानांची होती. म्हणून तें विमान, तेथें उभ्या असलेल्या विमानांच्या रांगेंत उभें केलें. आणि चिटको त्या बागेची मजा डोळे भरून पाहूं लागले. अहाहा ! किती सुंदर ती बाग होती ! त्या बागेंतील झाडांना सोन्याचीं पानें व रत्नांचीं फळें

फुलें होतीं. जिकडे तिकडे सुगंध दरवळला होता आणि त्या सुगंधी वातावरणांत अनेक अप्सरा आपल्या गोड आवाजांत गायन करीत असून, एकीकडे नाचतही होत्या. आणि कितीएक यक्ष आणि किन्नर आपापलीं सुस्वर वाद्यें वाजवून त्या अप्सरांच्या गाण्याला साथ करीत होते. त्या अप्सरा तरी किती मोहक ! बोलून सोय नाही !

" या अपूर्व बागेचें नांव तरी काय ? " चिटकोनीं आपल्या मित्राला विचारलें.

" नंदनवन. " मिटकोनें त्या बागेकडे न पहातांच रुक्ष स्वरांत उत्तर दिलें !

" काय नंदनवन ! अहाहा ! माझे डोळे आज धन्य झाले. मित्रा, असलें उपवन आह्मां मनुष्यांच्या दृष्टीला पडणें म्हणजे सद्भाग्याचीच गोष्ट होय. "

" कबूल. पण बारा महिने आणि तेतीस काळ येथेंच रहाणाऱ्या आमच्यासारख्यांना यांत विशेष काय आहे ? "

" विशेष काय आहे ? " चिटको आश्चर्यानें म्हणाला. " अरे सोन्याचीं पानें, रत्नांचीं फुलें आणि..."

" असतील ! पण त्यांत विशेष काय आहे ? स्वर्गांतील प्रत्येक झाड आणि झुडूप अगदीं असलेंच आहे ! मग त्यांत आम्हांला कौतुक कसलें आणि चमत्कार तरी कसला ? "

" अरे वा ! " मिटकोच्या नेसलेल्या पीतांबराची निरी हातांत धरून चिटको म्हणाला. " किती सुंदर पीतांबर आहे हा. इतकावेळ मी त्याच्याकडे नीट पाहिलेंच नव्हतें. अरे आमच्याकडे एखाद्या संस्थानिकाला सुद्धां असलें वस्त्र लाभणें कठीण आहे ! "

" आणि म्हणूनच तेथें याचें महत्व ! " मिटको लगेच म्हणाला. " कोणाला नेसण्याला लंगोटी आहे, तर कोणाला धाबळी आहे, आणि कोणाला तागाचा मुगटा किंवा कद आहे. अशा ठिकाणीं कोणी रावबहादूर अगर कोणी गळेकापू श्रीमंत झळकफळक रेशमी पितांबर नेसून गेला, तर

त्याचें कौतुक ! पण इथेरे काय ! एखादा फाटका देव सहज घराबाहेर पडला, तरी त्याच्या नेसूं असलाच दिव्य पितांबर, अंगावर असलेंच उत्तरीय आणि डोक्यावर असला किरीट आपला असायचाच ! गरीबांना पिळून आणि भोळ्यांना लुबाडून त्याच संपत्तीचें वैभव त्यांच्यापुढें मिरवायला सांपडलें, तर त्यांत खरी मजा ! पण येथें काय ! मुळीं गरीबच कोणी नाहीं. जिकडे तिकडे एकच नमुना. मग यांत मजा कसली सांग पाहूं ? "

मिटकोचें बोलणें चिटकोला पटलें नाहीं, पण तें त्याला खोडूनही काढतां येईना. म्हणून विषय बदलण्याच्या हेतूनें तो मिटकोला म्हणतो—' पण गड्या, त्या नाचणाऱ्या अप्सरा तर बघशील ? त्यांतली प्रत्येकजण म्हणजे जणूं सौंदर्याची मूस ओतली आहे. '

" कबूल ! पण स्वर्गांतली प्रत्येक स्त्री म्हणजे मूर्तिमंत सौंदर्यच आहे. येथें कुरूप स्त्री औषधालासुद्धां सांपडायची नाहीं. आपल्या मृत्युलोकची गोष्ट अशी नाहीं. अनेक काळया, वेड्याविद्र्या, हेंदऱ्या, आणि कुरूप चेहऱ्यांत जेव्हां एखादा गौरवर्ण, नाजूक आणि अत्यंत सुंदर असा चेहरा चमकतो, तेव्हां पहाणारा इतका लोलूप होऊन जातो, कीं तो स्वतःचें देहभान विसरून जातो ! पण येथें काय ? सर्वच सुंदर ! त्यामुळें त्या सौंदर्यांतली आकर्षक शक्तीही पार नाहींशी झालेली आहे. चिटको, सुखाबरोबर दुःख हजर असेल, तर त्या सुखाची शोभा आणि गोडी. सौंदर्याजवळ कुरूपता, श्रीमंतीजवळ दारिद्र्य, प्रकाशाजवळ अंधार, आरोग्याजवळ बहात्तर रोगांची पलटण, विद्वत्तेजवळ मूर्खपणा, आणि संन्याशाजवळ राजोपभोग जर हजर नसतील, तर या द्वंद्वांतील प्रत्येक चांगली गोष्ट फिकी आणि बेचव झाल्यावांचून रहाणार नाहीं. अरे, माझा हा दहा वर्षांचा अनुभवच तुझेजवळ बोलतो आहे, असें समज. फार कशाला, तुला सुद्धां कांहीं दिवस गेले म्हणजे याचें प्रत्यंतर येईल. "

एवढें बोलणें झाल्यावर आपल्या विमानांतून ते दोघेही घरीं येऊन पोंचले. अहाहा ! तें घर म्हणजे काय, मृत्युलोकांतील एखाद्या राजवाड्याला

झोंपडें म्हणायला लावील, इतकें थाटाचें आणि प्रचंड होतें. जिकडे तिकडे सुवर्णदीप थंडपणें तेवत होते. आणि साऱ्या घरांत विविध प्रकारचे सुगंध दरवळत होते. घरीं आल्याबरोबर, रत्नखचित सुवर्णपात्रांतून दोघांनींही घोट घोट अमृत घेतलें आणि परांच्या मऊ मऊ गाद्यांवर मोठ्या ऐटीनें पडले. बाहेर अप्सरा नृत्य करीत होत्या आणि देव आपल्या सुस्वर वाद्यांनीं त्यांना साथ करीत होते. तेव्हां चिटको पलंगावरून ताडकन उठून बसला आणि फुलपांखरांप्रमाणें चमकणाऱ्या त्या अप्सरांकडे पहात म्हणाला ' मिटको, ही मजा पाहिलीस का ? '

' तूंच पोटभर पहा ! मी काय, दिवसभर तेंच पहात आलों आहें आणि करीत आलों आहें. '

' म्हणजे ? करीत आला आहें, म्हणजे काय ? ' चिटको आश्चर्यानें म्हणाला.

' इंद्राच्या दरबारांत नाचणाऱ्या रंभांना साथ करणाऱ्या मंडळींत मी आहें.' मिटको म्हणाला.

नंतर थोड्याच वेळांत मिटको घोरूंही लागला ! पण त्याला अरसिक समजून चिटको आपला खिडकींतून अप्सरांची गंमत पहातच होता. तो अगदीं जवळ जवळ उजाडेपर्यंत ! शेवटीं पहाटेच्या गार वाऱ्याच्या झुळकेनें चिटकोला तेथें खिडकींतच झोंपेनें पछाडलें.

याप्रमाणें पहिले चांगले सात आठ दिवस चिटको स्वर्गलोकची गंमत आणि स्वर्गलोकचीं सुखें यांत अगदीं गुंग होऊन गेला. पण पुढें हळूहळू त्यालाही त्यांत तितकेंसें नाविन्य वाटेनासें झालें आणि मिटकोचा स्वर्गांतील सुखांवरील अभिप्राय प्रथम जो त्याला अगदींच चमत्कारिक वाटला होता, त्यांत थोडा तरी अर्थ असावा, असें त्यालाही आतां वाटूं लागलें ! रोज तेंच अमृत, त्याच बागा, तींच विमानें, त्याच अप्सरा, आणि तेंच नृत्य, यांत चिटकोलाही आतां तितकी गंमत वाटेनाशी झाली !

याही गोष्टीला कांहीं दिवस लोटले. नंतर एके दिवशीं सकाळीं ते दोघे-

जण अमृत प्यायला बसले असतां चिटको म्हणतो—' गड्या, हें नुसतें अमृत रोज रोज पिऊन तुला कंटाळा नाहीं आला ? '

' कंटाळा येऊन काय करणार ? ' मिटको म्हणाला. आणि एका हातानें नाक धरून त्यानें वाटींतील अमृत पिऊन टाकलें !

' मिटको, आज कांदेनवमी आहे !' आपल्या बंडीच्या खिशांतलें पंचांग उघडून पाहून चिटको म्हणाला. ' आज सपाटून चांगलीं खुसखुशीत कांद्याचीं भजीं चापूं ! म्हणजे अमृताचा जिभेला बसलेला चिकटा तरी साफ निघून जाईल ! '

' वेडा तर नाहींस ? ' मिटको हंसून म्हणाला. ' अरे येथें स्वर्गात कांदे कुठले आणि भजीं तरी कुठलीं ! '

' म्हणजे ? स्वर्गात काय कांदेच नाहींत ? अरे स्वर्गातले कांदे तर आमच्या कांद्यापेक्षां मोठे आणि स्वादिष्ट असले पाहिजेत. '

' स्वर्गात कांदे नाहींत, लसूण नाहीं, धान्यें नाहींत अन अमृताशिवाय दुसरें कांहींच नाहीं. मग एवढा वेळ ओरडतों आहे तें काय ? '

' अरेरे ! मग तूं येथें कंटाळला आहेस तें बरोबरच आहे ! मला सुद्धा इतके दिवस अमृतापुढें इतर कुठल्याही खाण्याच्या पदार्थांची आठवण झाली नव्हती. पण तिन्ही त्रिकाळ अमृत खाऊन आतां आपण कंटाळलों बुवा ! '

एवढें बोलून उदास अंतःकरणानें चिटको, दिवाणखान्यांत इकडून तिकडे फेऱ्या घालूं लागला. आज त्याचा वेळही जातां जात नव्हता ! शेवटीं कंटाळून तो मिटकोस म्हणतो—' मिटको, एखादें वर्तमानपत्र तरी वाचायला आण. काय मिळेल तें आण ! जा लवकर. '

' अरे येथें कसलें वर्तमानच घडत नाहीं, तर वर्तमानपत्र तरी कसें असेल ? शिवाय देवांना वाटेल तेथलें दिसतें, वाटेल तें ऐकूं येतें, आणि वाटेल तेथें एका क्षणांत जातां येतें. मग वर्तमानपत्र कशाला ? '

' काय म्हणतोस, येथें कसलें वर्तमानच घडत नाहीं ? वर्तमानपत्रांत छापायला कांहीं बातमीच नाहीं ? '

' कसली बातमी छापायची ? ' मिटकोनें विचारलें.

' कां ? अंधारांतल्या गोष्टी ! '

' अरे येथें अंधारच नाहीं, मग अंधारांतल्या गोष्टी कोठल्या ? '

' बरें, आघात–अपघात ? '

' येथें आघातही नाहींत आणि अपघातही होत नाहींत ! येथें कोणी गाडीखालीं सांपडत नाहीं, कोणी उंचावरून पडत नाहीं, कोणी बुडत नाहीं कीं कोणी भाजत नाहीं ! आणि असले अपघात झालेच तरी कोणी चुकूनसुद्धां मरत नाहीं ! '

' बरें चोऱ्या, मारामाऱ्या, खून ? '

' तेंही कांहीं नाहीं ! ' मिटको एक दीर्घ श्वास टाकून म्हणाला ! ' अरे चोऱ्या, मारामाऱ्या आणि खून हे कशासाठीं होतात ? कनक आणि कांता यांच्यासाठींच ना ? मग त्याची तर येथें समृद्धि आहे ! ऐश्वर्य आणि सुंदर स्त्रिया यांची येथें लयलूट आहे ! खून होण्यालाही येथें कांहीं कारण नाहीं. आणि खून कोणाला करतां येणेंही शक्य नाहीं. कारण सगळेच अमृत खाणारे ! '

' या अमृतानें इथून तिथून सगळी घाण केली आहे ! ' चिटको त्रासून म्हणाला. ' बरें येथें कांहीं राजकीय चळवळ ? '

' तीरे कशाला ? येथें कोण कुणावर जुलूम करतो आहे ? जेव्हां पृथ्वीवरील एका देशांतील लोकें दुसऱ्या देशांतील लोकांना लुबाडतात, दास्यत्वांत टाकतात, तेव्हां त्या देशांत जी धडपड सुरू होते, तिचें नांव राजकीय चळवळ. जुलमानें त्रस्त झालेले लोक अमोल असा स्वार्थत्याग प्रकट करतात. त्यांचा स्वाभिमान जागृत होतो. अपमानानें आणि अन्यायामुळें त्यांचें रक्त सळसळूं लागतें. आणि स्वातंत्र्यासाठीं ते आपलीं सर्व सुखें, आपली संपत्ति, आणि आपला प्राण यांचें बलिदान करतात ! ' जुलमाविरुद्ध स्वातंत्र्य ' असा लढा मृत्युलोकांत सुरू झाला, म्हणजे माणसांना आपल्या अंगचे सद्गुण प्रकट करण्याला चांगली संधि मिळते. आणि शौर्य दाखवितां येतें.

येथें तसा प्रकार नाहीं ! येथें जुलूम नाहीं, त्यामुळें सद्गुणांना बाहेर डोकें काढण्याला जागाच नाहीं. म्हणून तेजस्वी देवांना येथल्या सुखकर जीविताचासुद्धां कंटाळा येतो. जेव्हां मृत्युलोकांत कांहीं पापी लोक एखाद्या देशाला गुलामगिरींत टाकतात, तेव्हां त्या दास्यत्वांत खितपत पडलेल्या देशांत जन्म घेऊन, देशाकरितां आणि स्वातंत्र्याकरितां स्वतःचें बलिदान करितां यावें म्हणून कितीएक देव त्या देशांत मानवयोनींत जन्म घेण्याची परवानगी मिळावी, म्हणून इंद्राजवळ याचना करितात !’

‘हं ! मग वर्तमानपत्रांत छापण्यासारखें येथें कांहींच घडत नाहीं म्हणतोस ! बरें कधीं लढाई बिढाई तरी ?’

‘छट ! नांवसुद्धां नाहीं ! पूर्वी स्वर्गावर दैत्यांच्या मोठमोठ्या स्वाऱ्या होत असत. पण अलीकडे देवांना अमृत मिळाल्यापासून आणि दैत्य मेल्यापासून स्वर्गांत नितांत शांतता वावरत आहे !’

‘अरेरे ! मग येथें कांहींच गम्मत नाहीं ! खाण्याचे निरनिराळे चवदार पदार्थ नाहींत, वर्तमानपत्रें नाहींत, पुस्तकें नाहींत, कीं कोरडीं व्याख्यानेंसुद्धां नाहींत ! एखादेवेळीं विरंगुळा करायला ताप, पडसें, खोकलासुद्धां नाहीं !’

“आतां बरोबर उमजलास !” मिटको म्हणाला. “जीवितांत खरी मजा यायला दोन्हीही बाजू पाहिजेत. नुसत्या सुखाच्या एकांगी बाजूनें जीविताला पूर्णत्व येत नाहीं. जन्म, मृत्यु, तसेंच व्याधि, म्हातारपण, आणि दुष्ट, मत्सरी, शंभर नंबरी मूर्ख, वृथाभिमानी, असली नमुनेदार मनुष्यें या सर्वांच्या अभावीं या स्वर्गाची अर्धी शोभा नाहींशी झाली आहे !”

‘हात्याच्या !’ चिटको हंसून म्हणाला. ‘असलीं मूर्ख आणि पाजी माणसें मृत्युलोकांत काय खेचून भरलीं आहेत. बियाण्यापुरतीं वर पाठवून देऊं का ? तेवढीं आमच्याकडची कमी तरी होतील !”

‘छे छे ! या सर्व मंडळीला स्वर्गांत यायला सक्त मनाई आहे ! मृत्युलोकांतली त्यांची कामगिरी संपली म्हणजे त्यांचीं पार्सलें परस्पर स्पेशल मेलनें यमपुरीस रवाना होतात !’

'त्यांना स्वर्गाचें द्वार बंद असलें तर तूंच आपला मृत्युलोकांत चल कसा ?'

'त्यांना जसें स्वर्गाचें द्वार बंद आहे, तसें आम्हांला मृत्युलोकाचें द्वार बंद आहे. पांचशें वर्षें मला येथेंच काढलीं पाहिजेत !'

'यांतून सुटायला तूं कांहीं उपाय केला नाहींस का ?'

'केला तर ! पण त्यांत यश आलें नाहीं ! इंद्राच्या नोकरींत कांहीं चूक केली, म्हणजे 'तूं मानव होशील' असा तो शाप देतो, हें मला ऐकून ठाऊक होतें. इंद्राच्या दरबारांत अप्सरांच्या नाचाच्या वेळीं सारंगी वाजविणारांत मी एक असतों. फारच थोडा वेळ मला हें काम करावें लागतें. मी एके दिवशीं इंद्राला राग येण्यासाठीं अशी युक्ति केली, कीं अप्सरांचा नाच ऐन भराला आला असतां मी माझ्या सारंगीच्या सगळ्या तारा तोडून टाकल्या आणि माझ्या धनुकलीनें सारंगीचें लांकूड मडक्यासारखें धोपटींत सुटलों ! या कृत्याचा योग्य तोच परिणाम झाला ! इंद्राला संताप आला आणि लाल डोळे करून आपल्या सहस्र नेत्रांनीं तो माझ्याकडे रागानें पाहूं लागला ! अशा रीतीनें माझें काम अगदीं होण्याच्या रंगाला आलें होतें. पण इतक्यांत त्या नाचणाऱ्या अप्सरांतील एका सुंदरीला माझी दया आली, आणि तिनें मध्यस्थी करून, सगळी घाण करून टाकली !"

'फुटलें कपाळ त्या टवळीचें !' चिटको रागानें म्हणाला. 'मिटको, मला तर परत गेलें पाहिजे !'

'हो ! ती तरी एक पंचाईतच आहे !'

'आणि त्यापूर्वी येथें प्यालेलें अमृत मला ओकून टाकलें पाहिजे !' चिटको म्हणाला. आणि लगेच त्यानें घशांत बोटें घातलीं. पण वांती बिलकूल होईना ! वांती करणारें औषध स्वर्गांत मिळणें दुर्घटच. म्हणून शेवटीं वांती होण्यासाठीं चिटकोनें स्वतःला खालीं डोकें वर पाय, अशा रीतीनें उलटें टांगून घेतलें ! पण काय चमत्कार सांगावा ? आपल्याकडल्या खेळांतील कांहीं रबरी बाहुल्या जशा उलट्या टाकल्या तरी आपल्या पुन्हा चवडिला

दोन पायांवर उभ्या राहातात, तसेंच चिटकोचें झालें! सटदिशीं तो आपला उलट्याचा सुलटा झाला !*

‘ छे ! छे ! मिटको, मी आतां येथें क्षणभर देखील रहायला खुषी नाहीं ! मला आपल्या विमानांतून आतांच्या आतां मुंबईस पोंचव कसा ?’

‘ पण आमचें विमान मृत्युलोकच्या जमिनीला स्पर्श करीत नाहीं !’ मिटको ह्मणाला.

‘ चालेल ! तूं मला एखाद्या घराच्या छपरावर अलग सोडून दिलास तरी मला पत्करलें. पण इथून आतां मला लवकर बाहेर काढ !’

चिटकोचा जाण्याचा निर्धार पाहून मिटकोनें आपलें विमान तयार केलें. आणि त्यांत बसून ते दोघे क्षणांत मुंबईस आले. एका सहा मजली घराच्या बरोबर कौलारावर मिटकोनें आपलें विमान आणलें. आणि चिटकोला त्या कौलारावर अलग सोडून दिलें ! त्या कौलांवर पडतांच चिटकोला जो धक्का बसला, त्यासरशी त्यानें एकदम दचकून डोळे उघडले ! आणि पहातो, तों पंचवीस रुपये फी भरून आपण ज्या विमानांत बसलों होतों, तें विमान अर्धातास फेरफटका करून, परत मुंबईनजीक आपल्या पहिल्या जागीं खालीं उतरलें आहे. आणि कौलारावर पडल्यामुळें आपण डोळे उघडले नसून आपलें विमान जमिनीला टेंकल्यावर जो धक्का आपल्याला बसला, त्या धक्यामुळें आपण डोळे उघडले आहेत ! आपला देव झालेला स्नेही मिटको आणि त्याच्याबरोबर आपण जे स्वर्गातील चमत्कार पाहिले, ते आपलें हें इंग्रजी विमान वरवर जाऊं लागलें असतां आपल्याला जी गुंगी किंवा चक्कर आली, त्या गुंगींतलेच सारे चमत्कार होत, याविषयीं आतां चिटकोची पूर्ण खात्री पटली !

---

* देवांची सावली पडत नाहीं, किवा भुतांचे पाय उलटे असतात, यावर ज्यांची श्रद्धा आहे, ते स्वर्गलोकांतील या वरील चमत्कारावर विश्वास ठेवतील, अशी आशा आहे !